


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






जानेवारी १९७०

रजतमहोत्सवी वर्ष

मूल्य १।। रु.

# दीपावली

१



अनुक्रमणिका



# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विळास

रजतमहोत्सवी वर्ष * जानेवारी १९७० * मूल्य १॥ रु.

## श्रे य ना मा व ली



ट्रे. नं. ३५७७६५
ram : DALALART

दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य गहाळ** झाले तर त्याची जबाबदारी **व्यवस्थापकावर** नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# रथ चालतो आहे. चालणारच आहे

कालाच्या अतूट उतरणीवरून जगन्नाथाचा रथ चालतो आहे. एक वर्ष सरलं, दुसरं उगवलं. वर्षे आली-गेली. येतील आणि जातील. काल पळत राहतो. काळ कुणासाठी, कशासाठी थांबत नाही. भरती कुणासाठी थांबत नाही. ती येते-जाते. पुन्हा येते-पुन्हा जाते. सागराला येणाऱ्या भरती-ओहोटीप्रमाणेच माणसाच्या जीवनालाही अशीच उधाण-ओहोटी असते. ती येते-जाते. गतिमान मन आणि गतिमान जीवन पळतच राहतं. 'काल'कडे पहायला 'काळा'ला वेळ नसतो. त्याची दौड असते 'उद्या'कडे. स्वार झालेला असतो तो 'आज'वर. 'आज' थकते, सरते तेव्हा नवीन 'उद्या' हासत-नाचत येते. ती 'उद्या' सरत नाही—सतत बोलावीत राहते. आशेची फुले फुलवीत राहते. स्वप्नांचे सुगंधी अत्तर फुलवीत राहते म्हणून आजच्या व्यथा-वेदनांचा दाह उरत नाही. उद्यावर झेपावत माणसे पळतच राहतात. काल-आज-उद्या यांचे हे अतूट व मोहक नाते ज्यांना उमजते त्यांच्या जीवनाला विष जाळू शकत नाही. त्यांचा पराभव निराशेला करता येत नाही. हे नाते उमजलेली माणसे अश्रद्धेवर, उणीवांवर, पराभवांवर मात करू शकतात. काळाची पाने पिसली जातच असतात. डाव रंगतच जातो. कारण हुकुमाची पाने असतात अखेर त्यांच्याच हातात. उद्याच्या दिशेने त्यांचा रथ धावतच रहातो. काळ-काम आणि वेग ह्यांचे गणित शाळेत शिकवले जाते. त्याचा यथार्थ उपयोग करून जी माणसे जीवन जगतात ती आपल्या गतिशील कामाने काळाच्या शिरी यशाचे डिंडिम पिटू शकतात. गतीचा कायदा पाळणारी माणसेच काळावर विजय मिळवू शकतात.

'१९६९' ह्या नावाचे संवत्सर संपले. १९७० च्या नव्या संवत्सराची पाने—कोरी पाने फडफडत आहेत. त्या प्रत्येक पानावर रामदास वा गीता दैनंदिनीच्या पानांप्रमाणे तूर्त तरी एक घोषणा लिहिली गेलेली दिसते आहे. ती घोषणा आहे समाजवादाची ! १९६९ साली ह्या घोषणेला पुन्हा एकदा साफसफाई लाभली आहे. उजाळा मिळाला आहे. गतीचा कायदा पाळला जाण्याच्या प्रतिज्ञा पुन्हा एकदा घोषित झाल्या आहेत. म्हणूनच १९७० च्या रोजनिशीतल्या पानोपानी 'समाजवाद' हा मूलमंत्र नोंदविला गेला आहे. काळ पळतो आहे. पळतच राहणार आहे. त्या रोजनिशीतल्या कोऱ्या पानावर समाजवादी 'कामा'ची नोंद गतीने करण्याची कामगिरी अखेर कुणा एका इंदिराजींवर वा त्यांच्या मंत्र्यांवर नाही. घोषणांपाठी उभी रहावी लागतात माणसे. क्रियाशील आणि गतिशील ! दैनंदिनीचे प्रत्येक पान फडफड करीत विचारीत आहे 'गतीचा कायदा पाळणार का ?' 'कामाचा नियम करणार का ?' "केल्या प्रतिज्ञांचे इमान राखणार का ?" त्यांची उत्तरे आम्ही द्यायची आहेत. तुम्ही-आम्ही-साऱ्यांनी. अखेर घोषणा जेव्हा कार्यान्वित होतात तेव्हाच नवा इतिहास आकाराला येतो. आमच्या निष्ठा जेव्हा ओठाऐवजी पोटातून येतात तेव्हा त्या निष्ठांना यशाची फुले-फळे येतात. 'बंड' म्हणून बंडे यशस्वी होत नाहीत. 'क्रांती'च्या जपमाळेने क्रांतीची देवता प्रसन्न होत नाही. ह्या साऱ्यांना निष्ठा-श्रद्धायुक्त कृतीचा, गतिशील कृतीचा अहेर द्यावाच लागतो. मोल न देता अमोल असे काही कधी हाती लागत नाही. १९७० साल विचारते आहे 'असे काही अमोल द्याल ? व्यक्तीला नव्हे. पक्षालाही नव्हे—देशाला द्याल ? व्यक्ति येतील जातील ! उरतात राष्ट्रे—इतिहास घडविलेली आणि घडवू इच्छिणारीही ! 'समाजवादी' भारत घडणार असेल, घडावा असे वाटत असेल तर त्या फडफडणाऱ्या पानांवर आमच्या कामाची नोंद करण्याची तयारी आम्ही केलीच पाहिजे. त्यासाठी गतीचा कायदा स्वीकारलाच पाहिजे. तरच कालपुरुषाच्या ह्या रोजनिशीत नव्या इतिहासाचे शिल्पकार म्हणून आपल्या नावांच्या नोंदी होतील. कदाचित त्या होणारही नाहीत. पायऱ्यांच्या दगडाला वा पायातल्या दगडांना कळसाची मानवंदना मिळत नाही. पण त्यानी गाडून घेतले असते म्हणून कळस चमचमतो. तो कळस चकाकत रहावा म्हणून आपण काळ—काम—वेगाचे गणित सोडवीत राह्यलच पाहिजे. मोडतोडीच्या १९६९ च्या 'व्यस्त' गणितातून १९७० च्या 'सम' समाजवादाचे उत्तर शोधून काढायचे असेल तर ही साधना आम्हाला करायलाच हवी, नाही का ? —— संपादक

## खरेखुरे सर्वांगीण प्रयत्न

स. न. वि. वि.

हें पत्र फार उशीरा लिहितोय याबद्दल क्षमस्व! आमच्या या आवडत्या मासिकानं गेल्या महिन्यात आपला रौप्य महोत्सव साजरा केला याबद्दल हे अभिनंदन आहे हे सांगावयास नकोच !

या मासिकाचा मी प्रथमपासून वाचक आहे आणि त्यानं जो एक विशिष्ट दर्जा सध्याच्या धकाधकीच्या नि अवमूल्यनाच्या काळात सांभाळला आहे त्याबद्दल त्याचा चाहताही! प्रथम या मासिकाकडे मी आकर्षिलो गेलो तो त्यातील अप्रतिम चित्रांमुळे नि सजावटीमुळे; पण पुढे त्यातील निरनिराळ्या सदरांनीं चांगलीच भुरळ पाडली (मासिकरूपात प्रसिद्ध होऊ लागल्यानंतर) 'दीपावली'ने उगीचच वादासाठी वाद माजविले नाहीत; परंतु कित्येक वादांवर, समस्यांवर उद्बोधक अशी चर्चा घडवून आणून वाचकांच्या विचारांना चांगलेच खाद्य पुरवले, नवीन दिशा प्राप्त करून दिल्या ह्याबद्दल आजचा मराठी वाचक कृतज्ञता व्यक्त केल्याखेरीज कसा राहील ? नुसतेच लेख किंवा चित्रं चांगली असतात असे नव्हे ! तर या मासिकाची छपाई, मांडणी इतकी आकर्षक नि नीटस असते की कुठलाही अंक हातात घेतला तरी एक दर्जेदार मासिक मिळाल्याचा आनंद होतो.

सध्याच्या सवंग लोकप्रियतेमागे धावणाऱ्या गल्लाभरू मासिकांच्या जमान्यात आपण निष्ठेने नि जिद्दीने हे मासिक चालवीत आहात हे खरोखरच कौतुकास्पद आहे. आपली ही निष्ठा, ही जिद्द अशीच कायम टिको—नव्हे ती उत्तरोत्तर वृद्धिंगत झालेली तमाम मराठी वाचकांना पाहायला मिळो हीच प्रभुचरणी प्रार्थना !

**बॉम्बे सेन्ट्रल**
**मुंबई नं. ८ —द. श्री. कुलकर्णी**

## सातत्याने टिकविलेला उच्च दर्जा

स. न. वि. वि.

दिवाळी अंकातल्या दोन्ही कादंबरिका वाचल्या. या दोन कॉन्ट्रिब्युशन्सनेच अंक गच्च झाला आहे. मला दोन्ही आवडल्या. अपरिचित वळणावरचा दळवींना सापडलेला विषय आणि त्यात अत्यंत सोप्या सरळ भाषेत पण विषयाचा नीट गळा पकडून बोलणारी दळवींची शैली ! त्यांची नायिका दुर्गामात्र अगदी उसवायच्या जागी उरकल्या सारखी वाटली नि शेवटही हलक्या फुलक्या कथेचा व्हावा तसा वाटला. कादंबरीकाच का, दळवी या विषयावर भली कादंबरीच करू शकतात असाही विचार मनात आला. वर्व्यांचा अत्यंत प्रामाणिक नायक आणि अगदी नेमका शेवट फारच आवडला. ही मात्र खरीखुरी कादंबरिका. तुमचा चित्रांचा आणि दीपावलीतील साहित्याचा इतक्या सातत्याने दर्जा टिकवणे हे मात्र सोपे नाहीच नाही.

**परळ, मुम्बई —सुरेश वेंगुर्लेकर**

## सुट्टी घेतच नाही ?

स. न. वि. वि.

'दीपावली'चा डिसेंबरचा अंक हाती पडला नि थक्कच झालो. मी चार मासिकांचा वर्गणीदार आहे. बाकीच्या तिन्ही मासिकांनी दिवाळी अंकानंतर सुट्टी घेतली आणि ती मासिके आता जानेवारीत भेटतील. 'दीपावली' तशी सुट्टी घेत नाही. हे पाहून आश्चर्ययुक्त कौतुक वाटले. तुमचा डिसेंबरचा अंक प्रसिद्ध होणार आहे हे मी खरोखर विसरूनच गेलो होतो आणि नेहेमीप्रमाणे २७।२८ तारखेला अंकाची वाटही पाहिली नाही. पण अंक हाती पडताच मात्र बरे वाटले. खास क्रिकेट पुरवणीत तरुण पण मुरब्बी क्रिकेटपटूंच्या मुलाखती खरोखरच सध्याच्या क्रिकेटच्या राजकारणावर विदारक प्रकाशझोत टाकणाऱ्या वाटल्या. श्री. अरविंद ताटके यांनी ग्रथित केलेली माहितीही वाचनीय आहे. श्री. अरविंद लवकरे यांचे टीकालेखही मर्मभेदी आहेत. अंकातील राजकीय व्यंगचित्रेही क्रिकेट अंकाला शोभेशी आहेत आणि मुखपृष्ठावरील पतौडीचे चित्र अंकाबद्दल उत्तम




कल्पना आणून देते. सुट्टी घेतली नाही म्हणून काहीतरी थातुरमातुर न करता नेहेमीच्यासारखाच दर्जेदार अंक दिलात याबद्दल धन्यवाद !

**पिंपरी-पुणे –विजय शेवडे**

## पन्नाशी ओलांडली ?

स. न. वि. वि.

आपला डिसेंबरचा अंक अथपासून इतिपर्यंत वाचला. उठल्यासुटल्या कोणत्याही विषयावर वृत्तपत्रांमधून 'पत्रे' लिहिण्याचे कित्येकांना वेड असते. त्यामुळे 'वाचकांच्या पत्रव्यवहारा'च्या सदरात तीच तीच नावे सतत दिसतात. अशा पत्रकारांची टर उडविणारी 'गादीगिरीकर' ही कथा बरी वाटली. हेमिंग्वेच्या मृत्यूबाबतचा लेख मासिकापेक्षा दैनिकात शोभण्यासारखा आहे. 'एक पानी कथा' हे आपले सदर कित्येक वर्षांनी भेटले. कथा खरंच गंमतीदार वाटली. पु. लं. आपण सन्मानपुष्प देऊन त्यांचा यथायोग्य केलेला गौरव वाचून आनंद वाटला. पण मराठी साहित्याच्या विविध दालनातून चमकणाऱ्या या साहित्यिकाने पन्नाशीचा उंबरा ओलांडला याची बोचही त्याबरोबरच आली आणि काळ किती भराभर जातो याची जाणीवही मनात घोळत राहिली. पु. लं. ना आणि ग. दि. माडगूळकर यांना दीर्घायु लाभो आणि त्यांचे उत्तमोत्तम साहित्य आम्हांला वाचावयास मिळो हीच इच्छा !

**इगतपुरी —सुधाकर टाकसाळे**









अनुक्रमणिका

एक प्रत्यकारी प्रदीर्घ कथा



—ज्ञानेश्वर नाडकर्णी



"घर कौलारू असावं की त्याला उघडी गच्ची ठेवावी याबावत माझा न् आक्काचा खूपच वाद झाला होता !"

गच्चीच्या एका कोपऱ्यात कठड्याला टेकून उभे राहून आप्पासाहेब वसंतरावांना सांगत होते. गच्चीवर मैफल रंगली होती. कोजागिरीच्या चांदण्यात, तलम चिकाच्या पडद्यातून एकमेकांकडे पाहावे तसे सतरंजी पसरून बसलेल्या मंडळींना वाटत होते.

"आज तरी आक्कांना वाटत असेल की घराला गच्ची केली तेच बरं केलं !" वसंतराव म्हणाले.

"हो, पण तुमचा तर्क चुकला जरा !" आप्पासाहेब म्हणाले, "कौलारू घराचा आग्रह मी धरला होता !"

गावात नाटकमंडळी आलेली होती. त्यातले एक नटवर्य आप्पासाहेबांच्या बरोबर पूर्वी कॉलेजात होते. सहज अचानक दोघांची गाठ पडली अन् कोजागिरीचा बेत जमला.

नटवर्यांचे गाणे तसे बेताचेच होते, परंतु समोर बसलेली मंडळी आपापल्या आवडीची नाटकातली गाणी आग्रह करकरून त्यांना म्हणायला लावीत होती. चांदण्यामुळे डोळे जसे फसत होते तसाच कानांनाही अस्सल गोडव्याचा भास होत होता !

"तुम्हांला माहीतच आहे... ही गेल्यापासून आक्कानंच संसार चालवलाय् आमच्या घराचा !" आप्पासाहेब वसंतरावाना म्हणाले "एवढा कौतुकाचा बंगला बांधला तेव्हा तिच्या आवडी-निवडी लक्षात घेणं जरूर होतं !"

"मग देवघर केलंय् ना मोठं ?" वसंतरावानी विचारले.

"देवघर. अन् सैपाकघरसुद्धा ! पण आता आक्काच तक्रार करत्येय् एवढी जागा कशाला सोडली म्हणून ! आम्ही सगळे दिवाणखान्यातल्या डायनिंग टेबलावर बसतो जेवायला, पण ती अजून सैपाकघरातच पाट मांडून घेते !"

मध्येच नटवर्यांनी एक छानशी तान मारली. वसंतराव तत्क्षणी त्या गळाला अडकले ! त्यांचे कान आता गाण्याकडे लागले.

एरवी त्याना साधे नाटकसिनेमा पाहायलासुद्धा फुरसत नसे. सेल्स टॅक्सच्या कामानिमित्त अधूनमधून मुंबईला जाण्याचा प्रसंग येई, तेव्हा वेळ शिल्लक असला तरच ते नाटकाला जात. अन् तेही मुंबईच्या एखाद्या मित्राची सोबत असली तर ! दिवसभराच्या धावपळीने दमून गेलेल्या जिवाला एअरकंडिशण्ड नाटकगृहात जरा आराम वाटे. पुष्कळदा वसंतरावाना झोप येई ! अन् मग रंगमंचावर

अनुक्रमणिका

चाललेले गाणे एखाद्या मायाजालासारखे त्यांच्या निद्रिस्त संवेदनेला लपेटून टाकी.

. मोठ्या उत्साहाने वसंतराव गाण्याच्या बैठकीकडे वळले.

आप्पासाहेब खालची व्यवस्था बघण्यासाठी जिना उतरून गेले.

सैपाकघरात आक्कानी त्यांच्या दोन मुली तर दिमतीला घेतल्या होत्याच, पण पाहुणी म्हणून पुण्याहून आलेल्या त्यांच्या मेव्हणीला—ऊर्मिलेलासुद्धा—आक्कानी कामाला जुंपले होते!

नवा बंगला झाल्यानंतरची ही पहिलीच कोजागिरी! गच्चीवर गाणे ऐकायला जमलेले बरेच जण या निमित्ताने आप्पासाहेबांच्या घरी प्रथमच पाऊल टाकीत होते. गाण्याप्रमाणेच आपल्या भरघोस आतिथ्याचासुद्धा त्यांनी आस्वाद घ्यावा ही आप्पासाहेबांप्रमाणेच आक्कांचीही मोठी ईर्ष्या!

"नवा बंगला बांधलास म्हणून उगाच नोकरांचा पांजरपोळ ठेवशील हो!" त्यांनी आपल्या भावाला बजाविले होते, "तशी मी काही उमा-निमाला धुणीभांडी करायला सांगायची नाही! आपल्याला काय शोभतं, काय नाही हे चांगलं समजतं मला! पण पुढंमागं दुसऱ्याच्या घरात जायच्या आहेत त्या त्या माणसांनी उगाच खडे नको फोडत राहायला!"

आक्का अगदी सहज ओघात बोलून गेल्या. पण त्यानंतर कितीतरी वेळ आप्पासाहेब उदासवाणे होऊन राहिले होते. मुली दुसऱ्याच्या घरी जाणार.. मग या बंगल्याला वारस कोण?

ज्याने त्यांच्या पश्चात् गादी चालवायची तो मवाली निपजला होता!

श्रीकान्त सिनेमात असतो असे लोकांनी त्यांना सांगितले होते. नशीब एवढेच की पोरगा अचानक एके दिवशी घर सोडून गेला ते पाहायला त्याची आई हयात नव्हती! उमा अन् निमा तर त्या वेळेला इतक्या लहान होत्या की आपल्याला एक वडील भाऊ आहे याची त्या विचाऱ्यांना जाणीवही नव्हती!

"कपबशा वगैरे पुरेशा आहेत ना?" स्वयंपाकघराच्या उंबरठ्याशी थांबून आप्पासाहेबांनी आक्कांना विचारले.

"तू रे कशाला करतोस काळजी?" आक्का उत्तरल्या, "गाणं अर्ध्यावर आलं की मला निरोप पाठव! दूध अन् फराळाचं आपल्याच पायांनी वर गच्चीवर चालत येईल!"

आक्का आज खुषीत होत्या. त्यांच्या हौसेला कधी नव्हे ती आज वाट मोकळी मिळाली होती. घर त्यांच्या भावाचे होते; परंतु त्याचा इतमाम त्यांच्या स्वतःच्या कामसूपणाने सांभाळलेला होता. गच्चीवर जमल्या होत्या त्यासुद्धा गावातल्या देवळात कथाकीर्तनाला आक्कांना भेटणाऱ्या शहाण्यासुरत्या पण केस पिकलेल्या बायका नव्हत्या. . गावातले प्रतिष्ठित वकील-डॉक्टर, स्वतःचे बंगले-मोटारी बाळगून राहिलेले लोक अन् त्यांच्या बायका-मुले नटवर्यांचे गाणे ऐकत बसले होते.

चार दिवसांनी नव्हे तर चार वर्षांनीसुद्धा या मंडळींनी आप्पांच्या घरच्या कोजागिरीची आठवण काढली पाहिजे!

**...आकाशातला चंद्र दूरदूर जात होता—कोजागिरी आठवणार नव्हती ती फक्त त्यालाच—त्याच्या अंगावर युगायुगांच्या जुन्या जखमांचे वण होते—**

आक्काना वाटत होते, या गच्चीवर जमलेल्या पोरांमध्येच आपल्या भावाचा एखादा भावी जावई असला पाहिजे! आता जाताना त्या बेट्याने आपल्या सरबराईचे ठसठशीत चित्र आठवणीतून नेले पाहिजे—मग एक वेळ तेरा-चौदा वर्षांच्या उमा-निमा त्याच्या ध्यानात न राहिल्या तरी चालतील!

आपला हा वेडगळ विचार आप्पासाहेबांना बोलून दाखवावा असे आक्काना वाटले. एरवी त्या बोलल्याही असत्या कदाचित्! पण त्या पोरीच जवळपास वावरत होत्या; म्हणून त्यांनी स्वतःला आवरले.

अन् तितक्यात आप्पासाहेबही आपल्या खोलीत गेले...

खोलीत जाऊन, दिवा न लावता, आप्पासाहेब तसेच खिडकीपाशी जाऊन उभे राहिले. बाहेर कोजागिरीच्या चांदण्याने रस्त्यापलीकडल्या झाडांची एकच सरमिसळ करून टाकली होती. पांढुरक्या, करड्या रंगाच्या ढगात कुंचला बुडवून कोणा अज्ञात हाताने जणू त्या झाडांची पोपटी-हिरवी पालवी रंगवून टाकली होती.

रस्ता निर्मनुष्य होता. अलीकडच्या अंगाला पाहुण्यांपैकी एक दोघांच्या मोटारी पांढऱ्या गुबगुबीत ससासारख्या निश्चल बैठक मारून बसल्या होत्या. सशाच्या बिलोरी डोळ्यांसारखे त्यांचे पुढचे दोन दिवे चांदण्यात मंदपणे लखलखत होते...

आप्पासाहेबांना विलक्षण उदास वाटू लागले. वसंतरावाना खाली आणून आपण त्यांच्याशी गप्पा मारीत बसलो असतो तर बरे झाले असते असे त्यांना वाटले... वसंतराव त्यांच्यापेक्षा वयाने कितीतरी लहान. एक वेळ आप्पासाहेबांना अशी आशा होती की ते आपल्या मेहुणीला, उर्मिलेला, करून घेतील... पण आता ती आशा त्यांनी सोडली होती...

म्हणजे वसंतरावांना दरम्यानच्या काळात दुसऱ्या कोणी गटविले होते असे नव्हे! आपल्या कापड दुकानाच्या धंद्यात वसंतराव इतके बुडून गेले होते की लग्नाचा विचार त्यांना सुचतदेखील नव्हता! निदान ते तसे सांगायचे—अन् आप्पासाहेबांचा त्यांच्या बोलण्यावर विश्वास होता.

वसंतराव गाण्याला आलेले आहेत हे कळल्यापासून आक्कांच्या बरोबरीने सैपाकघरात वावरणाऱ्या ऊर्मिलेचे मन सैरभैर झाले

अनुक्रमणिका

होते. कॉलेजला सुट्टी नव्हती, तरी आप्पासाहेबांच्या आग्रहावरून, कोजागिरीच्या निमित्ताने, ती दोन दिवसांपुरती इथे आली होती.

एकदा पुण्याला ती आपल्या मैत्रिणींबरोबर स्टेशनच्या रेस्टोरंट-मध्ये जेवायला गेली होती, तेव्हा तिला वसंतराव दिसले होते. प्रवासाचा शीण त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. दाढीचे खुंट वाढले होते. . .पण तिच्याकडे पाहून ते हसले तेव्हा क्षणभर तिच्या मनात चांदणे फुलून निघाले. आपणच त्यांची नजर वेधून घेतली, अन् याचा अर्थ. . .आपली केवळ पूर्वीची ओळख आहे असा नव्हे तर आपणे सुंदर दिसतो, नावापुरता परिचय असलेल्या माणसालाही आकर्षक वाटतो, असा आहे अशी तिने मनाची समजूत करून घेतली.

त्या आभासामुळे, त्या दिवशी दुपारी जशी ऊर्मिलेची तंद्री लागली होती तशीच आता, त्या गोड आठवणीची एकेक सुगंधी पाकळी उलगडण्यात ती गुंग होऊन गेली.

. . .तसाच खरकटा हात घेऊन वसंतराव आपले टेबल सोडून तिच्या टेबलापाशी आले तेव्हा, जणु बेसावधपणे चोरी करताना पकडलेल्या बालकृष्णाप्रमाणे ती लटकेच बावरली होती !

"तुम्ही इथं कॉलेजात असता होय ?" वसंतरावांनी विचारले.

"हो. . .अन् या माझ्या हॉस्टेलमधल्या मैत्रिणी !" ऊर्मिलेने ओळख करून दिली.

"मी आता दौंडलाच चाललोय् !" वसंतराव म्हणाले, "इथं पुण्यात काही काम होतं म्हणून थांबलो ! आप्पासाहेबांना काही निरोप ?"

"विशेष काही नाही ! मी भेटले होते म्हणून सांगा !"

तसेच वेसिनकडे जाऊन, हात धुवून, आपली बॅग घेऊन, वसंतराव निघून गेले होते.

"जेवण अर्धंच टाकून गेले की ग ते !" ऊर्मिलेबरोबर जेवायला आलेली एक मैत्रिण म्हणाली.

## ' क्विग हम्बग' अधिवेशन




गरिबाची वाट पहाताइत !

ऊर्मिला काही बोलणार इतक्यात तिला ठसका लागला !

"तुझी आठवण काढली बघ त्यांनी !" डोळे मिचकावीत दुसरी मैत्रिण म्हणाली. . . .

* *

आटीव, केशरी दुधाच्या किटल्या भरता भरता ऊर्मिला विचार करीत होती. . . आज आपल्याला वसंतरावांना एकटे गाठता येईल का ? निदान फराळ अन् दूधपानाचा कार्यक्रम झाला की आपण गाण्याला जाऊन बसावे ! त्या आधी कपबशांचा ट्रे वर नेण्याच्या निमित्ताने. . .आधी वर गेले पाहिजे. . . वसंतरावांना स्वत: दूध नेऊन दिले पाहिजे !

गच्चीवर नटवर्यांचे गाणे ऐन रंगात आले होते. नुकतेच "झाले युवती मना" संपवून त्यांनी "उगीच का कान्ता" आळवायला सुरुवात केलेली होती.

"उगीच का कान्ता ?<br>आ कान्ता ?<br>दावितांव् ?<br>उगीच काव् ?"

ऐकणाऱ्यात जर कोणी खरा दर्दी असता, अगर त्याला आप्पासाहेबांच्या घरच्या पाहुणचाराची कदर नसती, तर त्यानेसुद्धा नटवर्यांना "उगीच का ?" असा प्रश्न विचारला असता !

खरे म्हणजे नटवर्यांची एका वेगळ्याच अर्थाने समाधी लागली होती. त्यांना स्वत:चे गाणे मुळी ऐकूच येत नव्हते ! त्यांचे कान लागले होते जिन्यावर चाललेल्या कपबशांच्या किणकिणाटाकडे !

गाणे ऐकता ऐकता वसंतरावांची नजर हळूच श्रोतृवृंदामधल्या स्त्रियांवरून फिरत होती. गाणे ऐकण्याचाच अर्थात् तो एक भाग होता. मध्यरात्र उलटून बराच वेळ झाला होता. . .तरी आज त्यांना मुंबईच्या थंडगार नाटकगृहातल्याप्रमाणे डुलकी लागत नव्हती ! आज ते ताजेतवाने होते. त्यांनी घोटून दाढी केलेली होती. घरून निघताना घाईघाईत ते हाताला थोडे अत्तरही चोळून आले होते.

सकाळीच आप्पासाहेबांच्या बंगल्यावरून जाताना खिडकीत ऊर्मिलेला पाहिल्यासारखे त्यांना वाटले होते. क्षणभर त्यांच्या मनात एक इच्छा एकदम उफाळून आली. . . वाटले, की असेच मागे वळून बंगल्यात शिरावे !

पण तसे काम काहीच नव्हते, अन् काय सबब सांगावी ते वसंतरावांना सुचेना. आणि मग त्यांची चाल किंचित् मंदावली. जरा पुढे गेल्यावर पुन्हा एकदा त्यांनी झटकन् मागे वळून पाहिले. हो, खिडकीत उभी होती ती ऊर्मिलाच ! पुण्याच्या स्टेशनात दिसली होती त्यापेक्षा बरीच वेगळी दिसणारी—पण तीच !

काहीतरी बदलले होते. . . .केशरचना ?

की सबंध चेहरामोहराच ?

की वसंतरावांची स्वत:ची दृष्टीच बदललेली होती ?

* *

खिडकीबाहेरचे चांदणे बघता बघता, आपण कशासाठी खोलीत आलो होतो तेच मुळी आप्पासाहेब विसरले होते !

मग त्याना आठवले. .तिजोरीतून नटवर्यांच्या बिदागीचे पैसे काढून न्यायचे होते !

आप्पासाहेबांना वाटले—नटवर्य अन् आपण एकत्र कॉलेजमध्ये असताना किती छंदफंदांभोवती सहज लीलेने आपला वेळ ओवाळून टाकला होता ! बालगंधर्व—दीनानाथांचे एक नाटक सोडले नाही . . . झालंच तर गाण्याच्या मैफली, अधूनमधून मित्रांच्या आग्रहाला बळी पडून पाहिलेले तमाशे. .सारे अवलंबून होते घरून येणाऱ्या मनीऑर्डरीवर !

नाटके पाहायला मिळावी म्हणून होस्टेलच्या मेसची बिले भरण्याची चालढकल करावी लागली ! अखेर नटवर्यांनीच युक्ती काढली. मेसचे कंत्राट स्वतःकडेच घेतले ! म्हणजे नाटकापरी नाटकांचाही सुकाळ अन् दिवसाकाठची दोन जेवणेही निश्चित !

. . .श्रीकान्त बराचसा आपल्याच वळणावर तर गेलेला नव्हता ?

हा विचार मनात येताच आप्पासाहेब दचकले. श्रीकान्त घर सोडून कां गेला या प्रश्नाला तोंड द्यायचे त्यानी आजवर टाळलेले होते. पण आता हा छानसा बंगला बांधून झाल्यावर त्याला पुरते घरपण कसे लाभेल याची त्याना भ्रान्त पडली होती. फक्त ती आप्पासाहेब स्वतःपासून लपवू पाहात होते.

'श्री, अरे, तुझा पत्ता माहीत असता तर तुला वास्तुशांतीलाच नसतं का बोलावलं ?' आप्पासाहेब कळवळून स्वतःशीच म्हणाले, "मी होऊन तुझे अजीजीनं पाय धरले पाहिजेत का रे पोरा ? अन् आता. . .आज इथं तू अचानक उगवलास तर तुझ्या धाकट्या बहिणींना काय सांगायचं ? कोणत्या तोंडानं सांगायचं ?"

तिजोरीतून शंभराच्या नोटा काढून त्या मोजताना आप्पासाहेबांच्या लक्षात आले की या कामासाठी आपण खोलीत दिवासुद्धा लावलेला नाही ! बाहेरच्या चांदण्यावरच आपण विसंबून आहोत ! . . .स्वतःच्याच घरात चोरासारखे वावरत आहोत !

आप्पासाहेबांनी टेबल लॅम्पचा टांगता स्विच दाबला. मनात दुःखाची पोकळी निर्माण व्हावी तसा पिवळसर प्रकाश खोलीच्या एका कोपऱ्यातले मोठाले वर्तुळ भरून राहिला.

"आप्पा, पुन्हा बोलला होतास का रे तू वसंतरावाना ?"

खोलीच्या उंबरठ्यावर उभे राहून विचारलेल्या या प्रश्नाच्या आवाजाने आप्पासाहेब चट्दिशी आपल्या तंद्रीतून जागे झाले.

"कशाबद्दल ?" तिजोरी बंद करीत, मागे वळून त्यानी विचारले.

"अरे, ऊर्मिलेबद्दल !"

"असं होय ? मला वाटलं श्रीकान्ताचा तपास करण्याबद्दल !"

"तेही आहेच रे, पण. . .ऊर्मिलेचं एकदा जमलं असतं तर—"

"खरं सांगू का तुला ?" आक्काजवळ जात आप्पासाहेब म्हणाले, "अलीकडे मी त्याना विचारण्याचं सोडून दिलंय् ! . . .पण आज पडेलच की गाठ त्या दोघांची ! आता दोघंही आपापलं हित बघून घ्यायला समर्थ आहेत की ! वयानं चांगली प्रौढ तर आहेत !"

"आज तुला अचानक श्रीची आठवण आली वाटतं ? दूध आणून देऊ का तुला ?"

आक्काचे कधी कधी आप्पासाहेबांना आश्चर्य वाटे. एखाद्या गंभीर विषयावरून त्या पुष्कळदा अनपेक्षितपणे एखाद्या सामान्य विषयाकडे वळत. जणू मसाल्याचे दूध हाच श्रीकान्ताच्या उफाळून आलेल्या आठवणीवरचा उतारा होता !

"नको, हा आता मी वरच गच्चीवर चाललोय् !" आप्पासाहेब म्हणाले.

आक्का पुन्हा सैपाकघराकडे निघून गेल्या.

आप्पासाहेबानी टेबल लॅम्पचा स्विच ऑफ केला अन् नोटा तशाच हातात घेऊन ते काही वेळ, भान हरपल्यासारखे, खिडकीतून बाहेर पाहात उभे राहिले.

कुंपणाबाहेर एक भिकारी उभा होता. हात पुढे करून तो रडवेल्या आवाजात ओरडत होता, "मायबाप, गरीबावर कृपा करा ! धर्म करा !"

त्या मायावी चांदण्यात आपला मुलगा खरोखरच भिकाऱ्यासारखा उभा आहे असे क्षणभर आप्पासाहेबाना वाटले. त्यांच्या हातांची किंचित् हालचाल झाली. दहादहाची एकेक नोट जणू आपल्याला न जुमानता हातातून निसटते आहे असे त्याना वाटले. त्या नोटांना पंख फुटले आहेत आणि फुलपाखराप्रमाणे उडत त्या श्रीकांताच्या हातात जाऊन बसल्या आहेत असे एक चित्र त्यांच्या मनाने झरंदिशी रेखाटले.

## 'क्विट पॉवर्टी' अधिवेशन




कुठे आहे तो गरीब माणूस ?










इतक्यात गच्चीवरून टाळयांचा कडकडाट ऐकू आला. नटवर्यांच्या सरबराईला आता गेले पाहिजे. थोडेसे मध्यंतर घेऊन ते आणखी गाणार की काय पाहिले पाहिजे पाहुण्यांमध्ये जाऊन मिसळले पाहिजे. .नाहींतर गावातले लोक तेवढयावरूनच आपल्याला आढयताखोर म्हणायला काहीं मागे पुढे पाहायचे नाहीत ! बंगला आजकालच्या पुण्या-मुंबईच्या अद्ययावत् पद्धतीने बांधला होता. गावातल्या जुन्या घरांच्या नजरेत तो सलत असणार.

गच्चीवर जाताजाता आप्पासाहेबांच्या मनात विचार आला, आजच्या या आनंदाच्या दिवशी आपल्या मनात ह्या कटु शंकाकुशंका कां डोकावताहेत ? या कोजागिरीच्या चांदण्यात न्हाऊन धुंद व्हायचे सोडून आपण जुनी दुःखे उकरून काढतो आहोत... मनाची कुरकूर आजच्या रात्री तरी थांबायला हवी. कोळयाने विणलेल्या धाग्याचा लेप जखमेवर लावला तर ती बुजते म्हणे. अखंड स्रवत असलेल्या या रूपेरी प्रकाशधारांच्या स्पर्शाने आपल्या जखमांवर खपली धरायला हवी !

* *

गच्चीवर आता मंडळींनी पाय मोकळे सोडून फराळाच्या बशांवर तुटून पडायला सुरुवात केली होती. नटवर्य तळहातावर तंबाखू चोळीत एका नव्या समाधीच्या तयारीला लागले होते. चांदण्यातला मघाचा धुरकटपणा जाऊन आता ते जास्त जास्त दुधाळ होत चालले आहे असे केशरी दुधाचा गरमगरम कप तोंडाला लावणाऱ्या पाहुण्यांना वाटत होते. ज्या कोणा एका दोघांना गाणे ऐकता ऐकता डुलक्या येत होत्या त्यांची झोप दुधाच्या स्वादानेच पार उडाली होती !

"दूध घेतलंत ?" ऊर्मिलेने वसंतरावांना विचारले.

आज ते किती वेगळे दिसत होते ! वयाने आपल्यापेक्षा मोठे ते नेहमीच वाटत, पण आज त्यांचा चेहरा किती टवटवीत, ताजातवाना वाटत होता ! जणू चंद्रकिरणांनी आपला सायीचा हात नेहमी कामाच्या गडबडीत असणाऱ्या त्या माणसावरून चिंतेत दिसणाऱ्या त्याच्या चेहऱ्यावरून फिरवला होता.

"घेऊ की !" बेसावध असताना कोणी तरी ओढल्यासारखे दचकत वसंतराव म्हणाले, "तुम्ही खास कोजागिरीनिमित्त आलात वाटतं ?"

"हो !" इकडे तिकडे दुधाच्या कपबशांनी भरलेला एखादा ट्रे हुडकीत ऊर्मिला म्हणाली. वसंतरावांनी तेवढयात तिच्याकडे नीट बघून घेतले !

आप्पासाहेबांच्या दिवंगत पत्नीची त्यांना आठवण आली. त्या वेळी ते मॅट्रिकच्या वर्गात होते. आप्पासाहेबांच्या घरची त्यांच्या वडिलांची थोडीबहुत ओळख होती; त्यांची स्वतःची नव्हती. एकदा संध्याकाळी घरच्या कापडाच्या दुकानात आप्पासाहेब आपल्या

[ पान ५४ वर पहा ]

अनुक्रमणिका









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



'....माझ्या गृहस्वामिनीसम सुंदर शरीरसौष्ठव लाभलेली अन्य स्त्री या भूमितलावर नाहीच अशी माझी गाढ श्रद्धा होती; पण आज माझा भ्रमनिरास झाला....'

# कुण्डे कुण्डे नवं पयः



डॉ. शामसुंदर रघुवंशी, डी. लिट

"जे अप्राप्य आहे त्याची वृथा अभिलाषा सर्वनाशास कारणीभूत होते." त्या सुन्दरीच्या क्षणैक दर्शनानेच कामविव्हल झालेल्या 'दंडपाणी'स उद्देशून सौमित्र उद्गारला.

"नाहीं मित्रा.. अप्राप्य मग ती कुठलीहीं गोष्ट असो, मीं नित्य ते एक आव्हानच समजतो व त्याचा स्वीकार करतो. मदोन्मत्त गजराज अथवा गजगामिनी मदनिका—दोघांचीहीं मृगया चित्ताकर्षक आणि पौरुषाला आव्हान देणारीच ...एका मृगयेत शस्त्रसामर्थ्याचें कौशल्य, तर दुसऱ्यात दंडास्त्राचे शल्य! परिणामीं अंतर्यामींच भिडणारे आणि परिणामकारताही तींच! वास्तव, कौशल्याचे मूल्यमापन भिन्न असले, तरीहीं पौरुषास उत्थापित करणारेच... अतएव आव्हानदायकच!" दंडपाणी समर्थनार्थ उद्गारला.

"हे मान्य करूनहीं या संदर्भात तुझीहीं मृगया अशक्यप्राय संभवते. कारण ती कोमलांगी क्वचितच बहिर्गमनार्थ उद्युक्त होते. आणि जर हरिणाक्षीच अनुपस्थित, तर मृगया तरी कशी साधणार?" सौमित्राने पृच्छा केली.

"तत्प्रीत्यर्थ भिन्न मार्गांचा अवलंब करावा लागेल हे मलाहीं ज्ञात आहे मित्रा." दंडपाणी ज्ञात्याच्या आवेशात उद्गारला. परंतु हीं तन्वांगी बहिर्गमनार्थ विशेष उद्युक्त न होण्याचे प्रयोजन ?"

"तिच्या पतीचा संशयग्रस्त व मत्सरी स्वभाव ....सौमित्राने समर्थन केले. वास्तव किंचितकालही तो तिच्यावरील बंधने शिथिल करीत नाहीं, अथवा कुणाही अभ्यागताचे स्वगृहीं स्वागत करीत नाही. आपल्या स्वरुपसुन्दर भार्येवर कुणाचीहीं वक्रदृष्टी पडू नये आणि तिच्याहीं कृपादृष्टीचा प्रसाद इतरेजनांस लाभकारक होऊ नये म्हणूनहीं कदाचित हीं बंधने असतील."

"परंतु आज वस्त्रालयात त्या चारुगात्रीची आकस्मिक दृष्टीभेट झाली आणि तिच्या शरसंधानानं मी तत्क्षणीच हतबल झालो. ही माझी अवस्था अवलक्षून तिने केवळ मलाच अभिप्रेत होईल अशा किंचित

मंदास्मिताने आवाहन केले आणि विद्युल्लतेच्या गतीनेच त्या वस्त्रालयातून आपल्या सखीसह ती अंतर्धान पावली. ते एकच स्मित आणि एकमेव कटाक्ष मला विद्ध करण्यास समर्थ ठरले. ही घटना त्या समयी तू चक्षुर्वैसत्यम अवलोकिली आहेस. अकारण कोणीही कुटुंववत्सला या मार्गाचा अवलंब करून एखाद्या वारांगनेसमान–त्रयस्थाशी स्मित वा नयनकूजन करीत नाही. यास्तव ती निश्चितपणे तृपार्त आहे यात मला रतिभरही संदेह नाही. आणि तृपार्त भूमीवर जलसिंचनासारखे दुसरे कोणतेच पुण्यकर्म या भूतलावर संभवत नाही," दंडपाणीने स्पष्टीकरण केले! "मित्रा तुझ्या प्रतिपादनात बरेच तथ्य आहे. मीही तुझ्या मताशी सहमत होऊ लागलो आहे. तिच्या एवंगुणविशिष्ट स्थितीवरून मला हे अभिप्रेत होत आहे की ती या बंधनशृंखलांमुळे अवमानित अतएव अतृप्ता असावी. अकारण अन्यायाने सज्जनांचाही बुद्धिभ्रंश होऊन ते दुर्जनांच्या मार्गाचा अवलंब करतात!–इथे तर सतत मत्सराने ग्रासलेले संशयग्रस्त वातावरण! कां नाही मानसिक अस्वास्थ्य जाणवणार? आणि ही सुखवंचित सुकोमला नागिणीसारखी सूडभावना कां नाही धारण करणार?" सौमित्राने पृच्छा केली.

"एकूण तू माझ्या मतांशी सहमत आहेस तर! बरे आहे सौमित्रा..." दंडपाणी त्याचा निरोप घेत उद्गारला आणि स्वगृही प्रवेशिता झाला.

परंतु त्याचे चित्त कशातच रममाण होत नव्हते. त्या सुहासिनीच्या वस्त्रालयातील क्षणैक दर्शनाने आणि त्या उरोजकुंभांच्या स्मृतीनेच त्याचे पौरुप जागृत होत होते आणि तिच्या मृगयेचा निर्धार त्याच्या मनात अधिकाधिकच वृद्धिगत होत होता. त्यानुसार पुढील संपूर्ण सप्ताह तिच्या निवासाचे स्थान व तदनुषंगिक वृत्त उपलब्ध करण्यातच त्यान व्यतीत केला. तिला किंचितही उपद्रव न होता सुखनैव मीलन घडून दोहोंचेही मनोवांच्छित कसे सफल होईल याची संपूर्ण योजना सिद्ध करून तो कार्यरत झाला.

तिला आपल्या अंतरीचा हेतू कळावा व तत्संबंधी तिचीही प्रतिक्रिया आकलन व्हावी तत्प्रीत्यर्थ दंडपाणीने एका वृद्ध परंतु अनुभवी व चतुर दूतीचे सहकार्य घेतले.

"या अर्धशतक सुवर्णमुद्रा. कार्यान्वित होण्यासाठी!" दूतीला तिजविपयीचा सर्व वृत्तान्त व सकल परिस्थितीचे साक्षेपाने वर्णन करून त्याने आपल्या मनींचा हेतू विशद केला. "उभयतांच्या मनःकामनासिद्धीनंतर तुझ्या कार्याचे इष्ट ते मूल्यमापन करून तुला अधिकच सुवर्णमुद्रांचा लाभ होईल याविषयी निःशंक राहा. मात्र हे कार्य सिद्धीस नेण्यास स्त्री समर्थ आहे व तत्प्रीत्यर्थ कोणतेही सहकार्य देण्यास तिची अनुमती आहे असा संदेश मजप्रत आणणे" त्याने स्पष्टीकरण केले.

"आपण अगदी निःशंक असावे आर्य. त्या चतुर वृद्धेने आश्वासिले. "आजमितीस कित्येक संभावितांचे आणि शीलवतींचे मीलन मी सहजसाध्य केले आहे." द्रव्याचा आदरपूर्वक स्वीकार करून ती वदली. "मात्र आपले संकेत स्थल आणि मीलन घटिका यांचेही स्पष्टीकरण व्हावे."

"उदईक चंद्रोदयानंतर माझे तिच्या गृही आगमन होईल. तिने निर्धास्तपणे माझ्या स्वागताची सिद्धता ठेवावी." इति दंडपाणी.

"परंतु तिचे स्वामी?" .दूतीने पृच्छा केली.

"त्याविषयी यत्किंचितही क्षिती बाळगू नये.. त्याची योग्य ती उपाययोजना व परिमार्जन माझ्या हस्ते होईल. तरी निःशंक असावे." असे म्हणून व वृद्धेला तिच्या अंगिकृत कार्यात सुयश चिंतून दंडपाणी सुखेनैव मार्गस्थ झाला आणि मनाच्या प्रफुल्लित अवस्थेतच क्षिप्रेच्या तीरावर अवतरला.

त्यासमयी नौकेचा एकमेव स्वामी 'भीष्मक' पैलतीरी होता त्याला दंडपाणीने साद घातली.

"आलो. आलो. आर्य." भीष्मकाने पैलतीरावरूनच प्रत्युत्तर दिले व मत्स्याच्या सहजतेने क्षणार्धातच त्याने आपली नौका दंडपाणीच्या समीप आणली.

"यावे. यावे... आर्य." तो द्रव्याभिलाषी नौकापती त्वरेने आवाहन करता झाला.

"क्षमा कर मित्रा. परंतु तुझ्या सेवेचा लाभ स्वीकारण्यास आज मी असमर्थ आहे." दंडपाणीने स्पष्टीकरण केले. "मात्र उदईक, चंद्रोदयानंतर शीतल चंद्रप्रकाशात, शुक्राच्या साक्षीने क्षिप्रेच्या शांत जलाशयात नौकाविहार करून आयुष्यातील काही क्षणांचे सार्थक करण्याचा मनोदय रचिला आहे. आणि तो तुझ्या सहकार्याव्यतिरिक्त सर्वथा अशक्य संभवतो."

"परंतु आर्य मी गृहस्थाश्रमी. चंद्रोदयानंतर आपली सेवा करणे म्हणजे भार्येला विरहावस्थेत तिष्ठत ठेवून पतिकर्तव्यात च्युत होणे. एतदर्थ पाप संभवते "भीष्मक म्हणाला.

"त्याचे क्षालन विपुल द्रव्यप्राप्तीने होईल" दंडपाणी उत्तरला.

"ते कसे व्हावे?" भीष्मकाने पृच्छा केली.

"माझ्या कार्यसिद्धीने लाभणाऱ्या दश सुवर्णमुद्रांनी तू तुझ्या स्वामिनीला उत्तम वस्त्रालंकारांनी आभूषित करू शकशील व त्या मोबदल्यात स्वामिनीच्या रागाचे अनुरागात रूपांतर होऊन तुझे गृहसौख्य उत्तरोत्तर असेच वर्धमान होईल. परंतु या विषयात तू अल्पसंतोषीच असलास तर मला माझे ईप्सित इतरत्र साध्य करावे लागेल. अनिच्छने केलेली सेवा मी त्याज्य मानतो." सुवर्णमुद्रांचे भीष्मकासमोर प्रदर्शन करून त्याचा निरोप घेत दंडपाणी उतरला.

"नाही, नाही आर्य....माझ्या निवेदनात तसा अर्थ अभिप्रेत नव्हता.." द्रव्याकडे अनिमिष नेत्रांनी पहात भीष्मक उद्गारला.

"ठीक आहे मित्रा...म्हणजे तुझा नियम तू अपवादाने सिद्ध करतोस. त्या त्या परिस्थितीनुसार अं?" दंडपाणी छद्मी स्वरात म्हणाला व त्याने भीष्मकाच्या ओंजळीत सुवर्णमुद्रांचे उदक सोडले.









अनुक्रमणिका

"कसचे, कसचे आर्य. आपल्यासारख्या सज्जनांची सेवा हेच अंतिम ध्येय आहे दासाचे. " तो निर्लज्जपणे वदता झाला." आपण निर्धास्तमनान स्वगृही गमन करावे. आपल्या आदेशानुसार उदईक चंद्रोदयापूर्वीच माझी नौका वस्त्राच्छादित करून तिच्यावर विश्रांतियोग्य यानगृह उभारून मी या स्थली उपस्थित होईन. आपण निःशंक असावे."

"ठीक आहे भीष्मका, आम्हां उभयतांचे आणि तत्सम अनेक प्रणयी युगुलांचे तुला नित्य धन्यवाद प्राप्त होवोत." दंडपाणीने आशीर्वाद दिला आणि तो पुढील योजना कार्यान्वित करण्यासाठी मार्गस्थ झाला.

द्वितीय वासरे सूर्यास्तानंतर दंडपाणी सुस्नात झाला. सुरभिद्रव्य विलेपनानंतर उत्तम वस्त्रे परिधान केली व त्या सुडौल कुरंगनयनेच्या मीलनार्थ चंद्रोदयापूर्वीच तो क्षिप्रेच्या तीरी अवतरला. दुरूनच त्याने नौकेवर तिष्ठत असलेल्या भीष्मकाला अवलोकिले. व त्या वस्त्राभूषित नौकागृहाकडे कटाक्ष टाकून संपूर्ण समाधान व्यक्त केले. प्रिय सखीसह आगमन केल्यावर त्या कोमलांगीला भीष्मकाच्या अनुपस्थितीमुळे तिष्ठत राहावे लागू नये यास्तवच त्याने भीष्मकाच्या उपस्थितीची खात्री केली व निर्धास्त मनाने आपल्या मीलनोत्सुक प्रियेच्या गृही मार्गक्रमण करून तो इच्छित स्थळी अवतरला.

तत्समयी चंद्रोदय झाला होता. शीतल वायुलहरी निशिगंधाचा मंद मधुर सौरभ प्रणयातुरांची विरहव्यथा अधिकच वृद्धिगत करीत होत्या.

"शुक...शुक..."– एक नादमधुर साद...त्याच क्षणी गवाक्षाच्या आकाशात चंद्रमुखीच्या मुखचंद्राचे रम्य दर्शन दंडपाणीस घडले आणि क्षणार्धातच वस्त्राच्या मेघाआड अंतर्धानही पावले. मात्र तत्पूर्वी एका चंपक पुष्पाने गवाक्षातून झेप घेऊन त्याच्या चरणांचा आश्रय घेतला. त्या प्रतीकाचा मनःपूर्वक स्वीकार करून दंडपाणी अंतर्गृह प्रवेशार्थ उत्सुक झाला. आणि निमिषार्धातच द्वाराचे उद्घाटन होऊन साक्षात् प्रिय सखीचेच त्याला दर्शन घडले.

'स्वागत असो आर्य. ' ती अधोवदना सलज्जावस्थेत मधुरवाणीने वदली आणि नतपल्लवीनेच तिने त्याला अंतर्गृहात अनुसरण्याचे आवाहन केले.

दंडपाणीने क्षणाचाही विलंब न लावता तिच्या आज्ञेचे पालन केले व तो अंतर्गृही प्रवेशिता झाला.

सस्मित मुद्रेने तिने त्याला आसनस्थ होण्याची विनंती केली व ती सुडौल कुरंगनयना दंडपाणीचे आदरातिथ्य करण्याच्या उद्देशाने अंतःपुरात अंतर्धान पावली.

दंडपाणी अस्वस्थचित्त होऊन उत्कटतेने तिची मार्गप्रतीक्षा करू लागला.

यथावकाश पेयपानाची सिद्धता करून ती शुभ्रवस्त्रानना सुहास्यवदनान अवतरली. आपल्या करकमलांनी तिने तो चषक दंडपाणीला अर्पिला.

"स्वीकार करावा आर्य" ती अर्धोन्मिलित नेत्रांनी हळुवार स्वरात उद्गारली.

'अवश्य, अवश्य...' दंडपाणी उत्तरला आणि त्या चषकाचा स्वीकार करण्याच्या निमित्ताने त्याने चषकासहित तिच्या करकमलांचाही स्वीकार केला. यास्तव ती अधिकच लज्जांकित होऊन अधोमुख झाली. तिची ही अवस्था पाहून दंडपाणीचे मनोधैर्य द्विगुणित झाले आणि त्यान चषकातील पेय स्वाहा करून तिच्या करकमलात आपलेही हस्त गुंफिले व तिला आपल्या सन्निध ओढले...

"ही साक्षात् पयोदा मजसमीप असताना त्या क्षुल्लक पेयपानाने माझी तृष्णा कशी शमावी ?" त्याने स्मित करीत पृच्छा केली...

"आपले ठीक आहे आर्य ! परंतु आपली तृषा शमविताना स्वामींचे आगमन झाले तर ? आपण याचक आणि मी दाती– उभयतानाही धरित्रीच्या उदरी आश्रयार्थ वास करावा लागल." ती कंपायमान होत वदली.

"त्याबाबतीत निर्धास्त राहा प्रिये. त्यांच्या आगमनाची सुतराम् शक्यता नाही. तरीही सावधानता असावी म्हणून आता व्यर्थ कालहरण न करिता माझ्यासह क्षिप्रेच्या तीरी मार्गस्थ व्हावे..."

'क्षिप्रेच्या तीरी ?' तिने भयाकुल स्वरात पृच्छा केली.

'होय तेच स्थान उभयतांना अधिक सुखकारक व निर्धास्त !'

"पण स्वामी अचानक उपस्थित झाले तर ?"

"आता निरर्थक शंकांचे त्वरित उच्चाटन करावे. तेथे स्वामींचे अस्तित्वही भासणार नाही. मात्र आपादमस्तक वस्त्रावगुंठन करूनच क्षिप्रातीरी सहगमन करावे."

'आपल्या प्रणयनाट्याचा हा प्रथमार्ध आणि त्यातील हे नमन. ' तिला आपल्या बहुपाशात घेत तिच्या ओष्ठद्वयांवर आपल्या दंतपंक्तींचा आलेख लिहीत तो उद्गारला.

"आज आपणच माझे स्वामी. आपलीच आज्ञा प्रमाण. ती सुहास्यवदना उत्तरली व तिने आपल्या करकमलांनी त्याला उत्थापित केले ! आणि काही काल त्यांना बाह्यसृष्टीचे विस्मरणच झाले !

'चलावं आर्य...' स्वतःला वस्त्रावगुंठित करून दंडपाणीसह निःशब्द अवस्थेत ती मार्गस्थ झाली...

"सुस्वागतम... यावे.... यावे आर्य..." आपल्या बलवान बाहूंचा आधार देत भीष्मकाने त्या प्रणयोत्सुक युग्माला नौकारुढ होण्यास साहाय्य केले व क्षणाचाही विलंब न लाविता त्याने नौकानयनास आरंभ केला.

दंडपाणी काही काल भीष्मकाशी वार्तालाप करीत होता. आणि ती तन्वांगी मात्र भीष्मकाने सुसज्ज केलेल्या नौकागृहात अंतर्धान पावली होती.

"हं आर्य ? आता विलंब कशाचा ? या समयी यत्किंचितही कालहरण निषेधार्हच समजतो मी ! ती विरहिणी आपली प्रतीक्षाच करीत असेल... तरी त्वरेने कार्यरत व्हावे..." भीष्मक सविनोद वदता झाला.

"खरे आहे मित्रा, –नौका तुझी तेव्हा तूच सत्ताधारी...स्वामी... तेव्हा

तुझ्या आज्ञेचे पालन हाच धर्म !" दंडपाणी हंसतमुखाने भीष्मकाच्या विधानाला अनुमोदन देत अंतर्गृहात प्रवेशिता झाला व क्षणभर सर्व शांतवत् झाले.

निःशब्द परंतु उत्सुक अवस्थेतच भीष्मक त्या वस्त्रावगुंठीत ललनेचे दीर्घकाल चिंतन करीत नौकायानात कालक्रमणा करीत असतानाच दंडपाणीचे अंतर्गृहातून पुनरागमन झाले.

"मित्रा भीष्मका" श्रांत स्वरात त्याने भीष्मकाला साद घातली.

"झाले मनोवांच्छित सफल आर्य ? भाग्यवान आहात, भाग्यवानच आहात. भीष्मक उद्गारला.

"भाग्यवान आहेच. समाधानीही आहे !" दंडपाणी उत्तरला. "परंतु त्या समाधानालाही अन्यायाच्या कृष्णमेघाने ग्रासिले आहे. म्हणूनच कार्यपूर्तीचा आनंद झाला तरीही खिन्नतेचे पटल, मी केलेल्या अन्यायाच्या निवारणाव्यतिरिक्त दूर होणार नाही !

"कसला अन्याय आर्य ?" भीष्मकाने पृच्छा केली.

"स्वार्थवृत्तीने मी माझे हित साधले आणि आनंदित झालो. परंतु तुला मात्र या निशासमयी लाभणाऱ्या पत्नीसौख्याला वंचित केले. मी तुष्ट झालो.. परंतु तुला मात्र तिष्ठत ठेवले." दंडपाणीने समर्थन केले.

"नाही आर्य, तत्प्रीत्यर्थ आपण मला सुवर्णमुद्रांचे दान. "

"मूढ आहेस ! अरे कामाग्नी कधी सुवर्णाने शांत होतो ? त्यासाठी एकच उपाय संभवतो. या तुझ्यावरील अन्यायाच्या निवारणार्थ आता एकच मार्ग... एकमेव पर्याय. तूही अंतर्गृहात जाऊन, ज्या पत्नीसुखापासून मी तुला वंचित केले आहे त्या सुखाचा–आनंदाचा निःस्पृहतेन परंतु रसिक मनाने स्वीकार करावा अशी माझी विनंती आहे."

"पण आर्य या दासावर.

"छे...छे मित्रा, यात तुझ्यावर अन्याय होणार नसून मी केलेल्या अन्यायाचे अंशतः परिमार्जनच होईल. तरी त्वरा कर... मात्र एक सूचना सावधानतेने ग्रहण कर.. ही सुखदायिनी उच्च कुलोत्पन्ना आहे. तत्प्रीत्यर्थ या गोष्टीची गुप्तता अत्यावश्यक संभवते. यास्तव कोणत्याही परिस्थितीत तिच्या मुखावरील वस्त्रावरण दूर न सारता आणि तिच्या मुखावलोकनाचा यत्किंचितही यत्न न करता संपूण निःशब्द अवस्थेत तू कायसिद्धी करावीस अशी माझी आज्ञा आहे. कारण तिचे किंचितही दर्शन वा तिजविषयीचा वृत्तान्त पट्कर्णी झाला तर तुझा सवनाश होण्याची निश्चिती समज... जा त्वरा कर. अकारण विलंब लावू नकोस. तिलाही समाजबंधने आणि शीलसंवर्धन या गोष्टी अभिप्रेत असल्यामुळे त्वरित स्वगृही गमन करावयाचे आहे." दंडपाणी उत्तरला.

"आर्य, आपली आज्ञाच असेल, तर तिचे पालन हे माझे श्रेष्ठ व आद्य कर्तव्य ठरते !" बुभुक्षित भीष्मक अंतर्गृहात प्रवेश करता करताच निरर्थक उद्गारला.

आणि काही काल दंडपाणी शांतचित्ताने क्षणापूर्वीच्या मधुर स्मृतींना आवाहन करीत क्षिप्रेचं सौंदर्य अवलोकित राहिला.

"धन्यवाद, आर्य त्रिवार धन्यवाद. पिंड, पिंडे मतिर्भिन्नः। कुंड कुंडे नवं पयः।" भीष्मक प्रफुल्लित होऊन उत्तरला, "या क्षणापर्यंत मी स्वतःला भाग्यवान पुरुष मानीत होतो !"

"तो कसा ?" दंडपाणीने पृच्छा केली.

"माझ्या गृहस्वामिनीसम शरीरसौष्ठव लाभलेली द्वितीय स्त्री या भूतलावर नाहीच अशी माझी गाढ श्रद्धा होती; परंतु आज माझा भ्रमनिरास झाला. ही माझ्या धर्मपत्नीपेक्षाही उत्कृष्ट भासली. भीष्मकाने समर्थन केले.

"अरे नतद्रष्टा ! म्हणजे ? तू मुखावलोकन केलेस ?" क्रोधायमान होऊन दंडपाणी उद्गारला.

"नाही...आर्य. .मी फक्त शरीर–सौष्ठवाविषयीच बोललो."

मग ठीक आहे. आता भविष्यात या घटनेविषयी संपूर्ण मौनव्रताचे पालन करणे. आता ज्या स्थानी आम्ही नौकारूढ झालो त्याच स्थानी पुनर्गमन करावयाचे. " त्याची आज्ञा ऐकून भीष्मकाने क्षणार्धातच पुन्हा नौकानयनास प्रारंभ केला व त्यांस इच्छित स्थळी आणिले.

"मित्रा मी (उभयतांच्याही) या सुखदायिनीला तिच्या स्वगृही पोचवून पुन्हा इथ आगमन करीन. कारण उदईकही यासम योजना कार्यान्वित करण्यासाठी तुझ मौल्यवान सहकाय संभवतेच. तरी या समयी तू याच स्थानी माझी प्रतीक्षा करण इष्ट . माझ क्षणभरातच पुनरागमन होईल. निश्चित असावे. "

भीष्मकाचा निरोप घेऊन दंडपाणी आणि ती सुकोमला मार्गस्थ झाली. तत्समयी मार्गावर दंडपाणी पुनर्मीलनाचे मनोरथ उभारित होता आणि ती चतुरिका अधोवदनान आपल्या मनात–'दंडपाणी' व आपला पती 'भीष्मक' यांच्या सामर्थ्याची तुलना करीत होती. ● ● ●



अनुक्रमणिका






दिवाळीत योजिलेल्या
विनोदी साहित्य स्पर्धेतील
तिसऱ्या पारितोषिकाची कथा



# आमची भान-गडची सहल



झाली या गोष्टीला पंचवीस-सव्वीस वर्षं. स्वातंत्र्य मिळायला अजून तीन-चार वर्षांचा टाईम होता. आम्ही म्हाळूपच्या शाळेत शिकत होतो. मराठी चौथीत दुसऱ्या वारीला होतो मी. इतभर गावाची टिचभर शाळा. पाव डझन मास्तरांच्या मानगुटीवर सात यत्तांचं जोखड होतं. आम्ही, शमळा व काळ संथपणे चालला होता. इंग्लंडची राणी वाळंतीण झाली—नववा का दहावा जॉर्ज मेला—तरी आम्हांला सुट्टी भेटायची. भो पंचम जॉर्ज भूप मान्य ऐवजी भो ऽ पंचम जॉर्ज भूत मान्यवरी अशा किंचाळ्यानं आम्ही प्रार्थना म्हणायची. मराठीच्या पुस्तकातल्या राणी व्हिक्टोरियाला दाढी-मिशा लावून तिचा व्हिक्टर मॅच्यूअर बनविल्याशिवाय आमचं रक्त थंड होत नसायचं.

घाण्याच्या बैलासारखी शाळा सुरळीत चालली होती. पोरं नापास होत होती. मास्तर व पुस्तकं बदलत नव्हती. सारं लाईनशीर चाललं होतं. गुरं डोंगरावर अन् पोरं शाळेत सोडून गावकरी खुशाल असायचे.

अन् एक दिवस इपरीत घडलं. भर मध्यरात्रीला सूर्य उगवल्यासारखं झालं. सारी पोरं क्षणभर चपापली. मास्तर मंडळी हरकली. आमच्या म्हाळूपच्या शाळेत पहिली मास्तरीण आली. शाळेतल्या सरस्वतीच्या फोटोच्या खालोखाल सुन्दर दिसणारी (अशी आमची तेव्हाची कल्पना) मास्तरीण म्हाळूपच्या शाळेत दाखल झाली. बाई होती पोरसवदाच (गावकरी मंडळींच्या मते). विशीच्या आत बाहेर वय. कसल्याशा शेंगेसारखा बांधा—कसल्याशा कळीसारखं नाक—तांदळाच्या पिठासारखी गोरीपान. आम्हा चौथी—पांचवीच्या मुलांना बाई चांगल्या वाटल्या—वरच्या वर्गातल्या मुलांना बाई सुन्दर वाटल्या—

**शाम शिराळकर**

मास्तर मंडळी तर खूष झाली. बाईचं आडनांव कार्लेकर होतं.

बाई शाळेत रमल्या—पोरात रुळल्या. पोरं काही सुधारली नाहीत, मास्तरच जरा टापटीपीत यायला लागले. बाईंच्याकडे पहिलीचा व यत्फंडीचा वर्ग होता. वरच्या वर्गातील मुलं बाईना उगाचच अभ्यासातल्या अडचणी विचारायला यायची. मास्तर पण बाईंच्या भोवती घुटमळायचे. बाई छडी मारत नसत. पोरांचे गालगुच्चे घेत. वरच्या वर्गातली पोरं उगाचच जळत.

आमच्या वर्गावर गणपुले मास्तर होते. तिशीच्या आतला हा मास्तर गुलछबू होता. गोरागोमटा—भरदार शरीराचा हा मास्तर शिकविताना पुस्तकापेक्षा छडीच जास्त वापरायचा. प्रेमळपणा, ममता इ. भानगडी त्या काळात नव्हत्या. अभ्यास आणि पोरं यांचा बुकणा पाडणे एवढंच शाळेचं काम होतं. पहावं तेव्हा दुर्योधनासारखा चेहरा

करून मास्तर वावरायचा. हा गणपुले मास्तर कधी सुधारेल ही आशा साऱ्या पोरांनी सोडली होती. कमीत कमी मार खाईल ते पोर जास्तीत जास्त हुषार समजलं जायचं. आमच्या शाळेत पोरी नव्हत्या. जन्मजात बुद्धीमत्ता प्राप्त होत असल्यामुळे तेव्हा स्त्री शिक्षणाचं फॅड नव्हतं. जागेवरच पोरींना समजूत यायची. समजूतदारपणे नवऱ्याच्या घरी जायच्या. त्यामुळे गावाला शाळेतल्या बाईचं अप्रुप झालं होतं. नापास झाल्यावर मागच्या वर्गात घालायची पद्धत असती तर आम्ही सारीजणं बाईंच्या वर्गात जायला तयार होती. तेव्हढंच गालगुच्च्यांचं सुख.

तर सांगायाची गोष्ट म्हणजे – काय सांगायचं ? सांगण्यासारखं काही घडतच नव्हतं. तेव्हाचं आमचं 'जीवन' म्हणजे– तेव्हा जीवन बिवन काही समस्या नसायची. माणसं नुसती जगायची. त्यालाच जीवन म्हणायची. सदऱ्याच्या शिशाच्या बटणाला सिग्रेटच्या पाकीटातली चांदी लावून पोरं रुबाब करायची. मोठी माणसं फेट्याचा रंग बदलून नवीनपणाचा भाव मारायची. सूर्य मावळायचा – चंद्र उगवायचा. आकाश जाग्यावर होतं. सारं सुरळीत चाललं होतं.

कधी नव्हे ते एक दिवस गणपुले मास्तरच्या चेहऱ्यावर हास्य उमटलं. गाईला रेडकू झाल्यासारखं साऱ्यांना आश्चर्य वाटलं. पोरांनी स्वतःचं शुद्धलेखन स्वतः तपासल्यासारखा चेहरा केला. गणपुले मास्तर आज गोडीगुलाबीत होते. मुलांना प्रेमळपणे काही तरी सांगत होते.

"हे पहा मुलांनो ! (पोरं छप्पराकडे पाहू लागली.) आता आपण काळाच्या अनुरोधानं पावलं टाकली पाहिजेत. नव्या जगाची ओळख करून घेतली पाहिजे. इतिहासाकडे डोळसपणाने पाहिले पाहिजे. काय समजलात ?" मास्तर सांगत होते.

आम्हाला वाटलं मास्तर शुद्धलेखनच घालत आहेत. आम्ही पाट्या सावरल्या. शुद्धलेखनाचं नाव काढलं की आमची शुद्ध हरपायची. मास्तरनी आम्हाला चुचकारलं.

**.......आमच्या शाळेत पोरी नव्हत्या . . . बायकांना जन्मजात बुद्धिमत्ता प्राप्त होत असल्याने तेव्हा स्त्री-शिक्षणाचं फॅड नव्हतं. जागेवरच पोरींना समजूत यायची. त्यामुळे शाळेला बाई आल्या त्याचं गावाला अप्रूप झालं होतं. . .**

"अरे शुद्धलेखन घालत नाही मी. पाट्या ठेवा दप्तरात. मी सांगतोय ते शांतपणे ऐका. आता आपल्याला इतिहासाची ओळख करून घेतली पाहिजे. आपल्या पूर्वजांच्या पराक्रमांनी पावन झालेली स्थळं पाहिली पाहिजेत. तोच आपल्या स्फूर्तीचा ठेवा आहे."

"म्हणजे काय गुरुजी ?" बबन्यानं शंका विचारली. एरवी ह्या शंकेला कानफाट मिळून बबन्याचं शंका-निरसन झालं असतं; पण आज मास्तर शांतपणे बोलत होते.

"मुलांनो ! तुम्ही उद्याच्या राष्ट्राचे आधारस्तंभ आहात. तुम्ही ऐतिहासिक स्थळांना भेट दिली पाहिजे. आपला सिंहगड-पन्हाळगड-प्रतापगड–सारं तुम्ही पाहिलं पाहिजे. काय समजलात ?"

"गुरुजी आम्ही सिंहगड सिनिमा पाहिलाय." तिनं-चौघं पोरं गुणगुणली.

"सिनेमात बघून काय उपयोग ? समक्ष डोळ्यांनी पाहिला पाहिजे. तिथला दगड अन् दगड इतिहास सांगेल. तर आपल्या शाळेची पन्हाळगडला सहल काढायचा माझा विचार आहे. दोन दिवसात आपण जाऊन परत येऊ. प्रत्येक विद्यार्थ्याला तीन तीन रुपये खर्च येईल. तुम्ही घरातून परवानगी (म्हणजे पैशासह) घेऊन या. पंचवीस-तीस विद्यार्थी आले तर सहल काढता येईल. उद्या विचारून या."

मग पाच-दहा मिनिटं पोरं आपसात कुजबुजू लागली. सहल म्हणजेच इंग्रजीत ट्रीप असं मन्यानं सांगितलं. गम्मत-मजा-चैन इथपर्यंतच आम्हाला सहलीचा अर्थ समजत होता. स्फूर्ती-इतिहासाची ओळख इ. वडीलधाऱ्यांचं काम आहे अशी आमची ठाम समजूत होती.

पोरं घरी गेली. साऱ्यांनी सहलीला जायचा निर्णय घेतला. घरून परवानगी आणि पैसे आणायच्या नादाला लागली.

दोन दिवस आईच्या मागं भुणभुणं लावलं. चार दोन वादाडे मिळाले. मग बाबांच्याकडे पैशाची मागणी. दोन-चार दिवस बाबांनी दाद दिली नाही. मग एकदाचे पैसे मिळाले. चार-दोन फटक्यांची किम्मत फारशी नव्हती. साऱ्यांच्या घरात चाल बदलून हेच गाणं झालं. काही पोरांनी नुसती परवानगी आणली. त्यांना मास्तरांनी ढीसमिस केलं. शेवटी पंचवीस-एक पोरं पैशासकट ट्रीपमध्ये सामील झाली. मास्तरांनी पसे गोळा केले आणि ट्रीपची तारीख झळकली. पोरं सामानसुमान गोळा करण्यात गर्कली. आठ दिवसांवर ट्रीप आली. चड्डया-सदरे ओढ्यावर धुवून आणले. गादीखाली ठेवून इस्त्री केली. ट्रीपला जाताना प्रत्येकानं दहा-दहा गुळाच्या पोळ्या आणि बारकी बरणीभरून लोणचं आणायची मास्तरांनी ऑर्डर दिली. दोन दिवस खराब न होणारं अन्न असावं म्हणून ही आखणी होती. अन् ट्रीपच्या अगोदर दोन दिवस शाळेतल्या एकुलत्या एक बाई आमच्या वर्गात आल्या अन् गणपुले मास्तरांना म्हणाल्या.

"तुमच्या वर्गाची सहल पन्हाळगडला जाणार आहे म्हणून ऐकलं. माझ्या पण मनात पन्हाळगड पहायचाय. मी येऊ का आपल्याबरोबर ?"

"आपण आनंदानं या ना. पण हेड मास्तरांची परवानगी घेतलेली बरी." गणपुले मास्तरनी सुचविलं.

"त्याची काळजी नको. हेडमास्तर मला परवानगी देतील. फक्त आपली काही हरकत नसावी म्हणून आधी विचारलं."

"मग काय आनंदच आहे मला. मुलांनापण बरं वाटल तुम्ही बरोबर असल्यावर."

आम्हा पोरांना बरं-वाईट काहीच कळत नव्हतं. बाई आल्या तर त्या थोड्याच आमच्या डोक्यावर बसून येणार होत्या ? एक वेळ सहलीत आम्हीच त्यांच्या डोक्यावर बसण्याची शक्यता होती. आम्ही पोरांनी गलका उठविला.



अनुक्रमणिका






"बाई येऊ देत. आम्हांला बाई हव्यात." आम्ही आमची परवानगी देऊन टाकली. गणपुले मास्तरच्या गोऱ्या चेहऱ्याचं सफरचंद फुललं. बाईनी हसून आनंद व्यक्त केला.

"पण बाईच्या वर्गणीचं काय ?" वाण्याच्या मन्याच्या डोक्यातल्या तराजूला वाचा फुटली.

"हो-मी देईन माझी वर्गणी. वाटलं तर आता घ्या." कार्लेकरबाई मोकळ्या हातानं बोलल्या. त्या काळी बायका पर्स बाळगत नव्हत्या. सरळ कडूसरीला पैसे लावायच्या. आता बायका नुसत्या पर्स बाळगतात. पैसे कुठंच नसतात. तेव्हा बाईनी आजच्या बायकांसारखंच केलं. वर्गणी देते म्हणाल्या पण दिली नाही. चालायचंच असं—बायकांचे पोषाख बदलतील—काळ बदलेल—कडूसरीऐवजी पर्स येईल—पण बायकांची वृत्ती जाम बदलायची नाही.

"अहो कार्लेकरबाई पोरांचं काय मनावर घेता ? द्या उद्या पैसे. पैसे काय कुठं पळून जातात काय ?" गणपुले मास्तर कधी नव्हत ते द्रवले.

शेवटी सहलीचा दिवस उजाडला. दिवस म्हणण्यापेक्षा संध्याकाळ म्हणणं योग्य होईल. संध्याकाळी पाच वाजता म्हाळूपहून निघून चालत चालत सांगलीला जायचं. अंतर फार तर दोन-तीन मैलांचं असेल. सांगलीला रात्री वस्ती करायची. पहाटेची पहिली गाडी पकडून कोल्हापूरला यायचं. कोल्हापूरहून मोटारीनं पन्हाळगडला जायचं असा कार्यक्रम होता. पोरं चारच्या आधीच वळकटया घेऊन हजर झाली. गणपुले मास्तर आणि कार्लेकरबाई पण टायमात आल्या. उगाच उशीर कशाला म्हणून गणपुले मास्तरनी पोरं मोजली आणि साडे चार वाजताच आम्ही म्हाळप सोडलं. डोक्यावर वळकटया ठेवून आम्ही चालू लागलो. रस्ता पायाखालचा होता. डोक्यावर वळकटया असल्यामुळं पोरं गप्प गुमान दंगा न करता चालली होती. गणपुले मास्तरांच्या हातात दोन पिशव्या होत्या. एक स्वतःची व दुसरी बाईची. बाई मोकळयाच होत्या. पोरांच्या मागून ते दोघं बोलत बोलत येत होते. आम्ही सहाच्या आत सांगलीला पोहोचलो. सांगलीत आलो ते थेट मोटारीच्या अड्डयावरच. त्या काळी यष्टी नव्हती. साध्या पासिंजर गाडया होत्या.

मोटारीच्या अड्डयावर पोरांची शिरगणती झाली. आणली होती तेवढी पोरं बरोबर होती. मग गणपुले मास्तर दुटांगी धोतर सावरत सावरत मोटार स्टँडवरच्या एजंटाकडे गेले. कार्लेकरबाईंनी मुलांची ओळख करून घेतली. गुजराच्या हसमुखलालच्या गालाचा गालगुच्चा घेतला. पोरगं लाजेनं लालबुंद झालं. अर्धा तास असाच हरवला. मग गणपुले मास्तर आले. पोरं बिचकली. गप्प ओळीत बसली. गणपुले मास्तर म्हणाले,

"आपल्याला उद्या सकाळी सात वाजता मोटार आहे. तुम्ही सर्वजण समोरच्या मारुतीच्या देवळात जाऊन गप्प बसा. तिथंच रात्री जेवायचं आणि वस्ती करावयाची. उद्या पहाटे उठून पहिल्या गाडीनं कोल्हापूरला जायचं. काय समजलात ? अन् ए सखाराम तू वर्गाचा. सेक्रटरी. साऱ्यांनी सखाराम सांगेल तसं वागायचं." गणपुले मास्तरनी सखाराम विभूतेकडे अंगुलीनिर्देश केला.

सखाराम विभूते आमच्या वर्गातला बाप्या होता. प्रकृती दणदागट—बुद्धी त्याच्याशी व्यस्त प्रमाणात. एरवी तो पोरांना बेदम मारायचा. आज त्याला पर्वणी मिळाली म्हणून गडी खुलला. आम्ही मारुतीच्या देवळाच्या ओवरीत भिंतीकडेला वळकटया मांडून ठेवल्या. पाचदहा मिनिटं गलका उठला. पोरांच्या एकमेकात मारामाऱ्या झाल्या. जागेवरून भांडणं झाली. प्रत्येकाला कोपरा हवा होता. सखाराम विभूते शांतपण पहात होता. गुणपुले मास्तर आणि कार्लेकरबाई मोटार स्टँडवरच गप्पा मारत उभे होते. पोरं आपापसात मारामाऱ्या करून थकली. मग सखारामनं ओळीनं साऱ्या पोरांना सपाटे मारले. गणपुले मास्तर परवडले म्हणायची वेळ आली. मग गणपुले मास्तर आले.

"हे पहा मुलांनो आता तुम्ही इथं शांतपणे बसा. भूक लागली की जेवण करून घ्या. तोवर मी आपल्या कार्लेकरबाईना त्यांच्या मामांच्या घरी पोहोचवून येतो." असे म्हणून गणपुले मास्तर बाहेर पडले. सोबत कार्लेकरबाई पण गेल्या.

गणपुले मास्तर बाहेर पडल्यावर पाचच मिनिटात मन्या वाणी इवळायला लागला. "आई ऽऽग माझी दाढ दुखतीया. मी माझ्या आत्याच्या घरी जातो." मन्यानं सखारामला सांगितलं. मन्याची आत्या सांगलीतच रहात होती. तो वरेचवर तिच्या घरी जातही असे. पाठीला व्याद नको म्हणून सखारामनं मन्याला आत्याकडं जायला परवानगी दिली. मन्या पण मुलखाचा दळूबाई होता. एवढंस काही झालं की मुळूमुळू रडायचा. सेक्रटरीची परवानगी मिळताच मन्या बाहेर पडला. आत्याच्याच घरी जायचंय मग वळकटीचं तरी ओझं कशाला म्हणून तो तसाच गेला.

रात्रीचे आठ वाजले तरी मास्तरांचा पत्ता नाही. वाट पाहून पाहून पोरं कंटाळली. मग आम्ही सारेजण अंगत पंगत करून जेवायला बसलो. डबे सोडले. एकमेकांना आपल्या डब्यातील पदार्थ वाटले. पोटभर जेवण झाल्यावर वळकटया पसरल्या व गाण्याच्या भेंडया लावत लावत सारीजणं












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





झोपी गेलो. सखाराम विभूते आमचा बॉडी गार्ड म्हणून उंबऱ्याच्या बाजूला डोकं करून झोपला. अजून मास्तर फिरकले नव्हते.

सकाळ झाली. सूर्याची पिल्लं डोकवायला लागली. आम्हाला गणपुले मास्तरांनी जागं केलं. कोपऱ्यात झोपलेल्या मन्या वाण्याच्या पेकाटात लाथ घालून उठवावं लागलं. आम्ही डोळे चोळत चोळत उठलो. सखाराम विभूते तर उठल्यावर चक्क किचाळला.

"मास्तर रात्री किती वाजता आलात तुम्ही ? काय समजलं पण नाही. अशी जाम झोप लागली." सखारामनं डोकं खाजवत विचारलं. मन्या वाणी रात्री केव्हा येऊन झोपला हे पण कुणाला समजलं नव्हतं. सारीजणं मन्याकडं प्रश्नार्थक चेहऱ्यानं पाहू लागली.

"उगाच डोळे फाडून बघू नका माझ्याकडं. रात्री आत्याकडं जाऊन दाढेला औषध लावलं. जरा झोप लागणार तर ढेकणांनी बेचार केलं. मग रात्री आत्याच्या मालकांनी आणून पोहोचवलं मला परत इथं. तोवर तुम्ही सारीजणं ढाराढूर झाला होतात." मन्यानं आपण होऊन कबुली दिली. मास्तरना उशीर कां झाला हे विचारायची हिम्मत झाली नाही. मग सारीजणं वळकटया गुंडाळून तोंड धुवायला पळाली.

"ए सखाराम मी जरा गाडीची चौकशी करून येतो तोवर तुम्ही सारं उरकून घ्या." अशी सूचना देऊन गणपुले मास्तर मोटार स्टॅंडवर गेले.

तासाभरानं गणपुले मास्तर कार्लेकर बाईंच्यासह परतले. गणपुले मास्तरांच्या चेहऱ्यावर रागाची छटा होती. फुटलेल्या सीताफळासारखा चेहरा करत त्यांनी सखाराम विभूतेला जामलं.

"ए सख्या ! कुंभकर्णासारखा झोपलास तू. आता वाजलेत नऊ. सकाळी साडेसातला लाथा घालून उठवलं तेव्हा उठलात घोडयांनो. कोल्हापूरची पहिली मोटार सकाळी सात वाजताच गेली. अता पुढची गाडी बारा वाजता. पन्हाळगडची गाडी कोल्हापूरहून सकाळी दहा वाजता असते. इथंच दहा वाजायची वेळ आली. आता काय कपाळ जाणार पन्हाळगडला ? उद्या सकाळपर्यंत कोल्हापुरात रखडायला हवं. मग पुढं पन्हाळगड."

सखाराम हादरला. त्याला काही सुधरेना. कसातरी तो अडखळत बोलला.

"मास्तर मला वाटलं तुम्ही पहाटे उठवाल आम्हाला. मीच जागा झालो नाही तर इतरांना कसं उठवणार ?"

"गधडया तुला सेक्रेटरी केलं ते काय कुंभकर्णासारखं घोरायला ? एवढा घोडा झालास तरी तुला अक्कल कवडीची नाही." असं म्हणून गणपुले मास्तरांनी सखारामच्या थोबाडीत दिली. सारी पोरं भेदरून गेली.

"उगाच कशाला मारता बिचाऱ्याला ? पोराची जात झोपली असेल. ट्रीपचं काय एवढं मोठसं. आज जमलं नाही तर परत कधी तरी जाता येईल. पन्हाळगड थोडाच पळून जातो काय !" कार्लेकरबाईंनी गणपुले मास्तरांची समजूत घातली.

"बाई! तुम्ही म्हणता ते खरं आहे, पण निष्कारण एक दिवस वाढला. थंडीवाऱ्यात निष्कारण दिवस काढायचे. वरं पोरांच्या डब्यात अन्नही पुरेसं नसणार. लोकाची पोरं वेळेवर सुखरूप घरी परत करायला नकोत का ? सगळा कार्यक्रम फिसकटला. ह्या कारट्यांच्या झोपा म्हणायच्या का सोंग ?" गणपुले मास्तर थोडसे शांत झाले.

"मग असं करा ना, आपण सारीजणं परत म्हाळूपला जाऊ. परत कधी तरी ट्रीप काढू. त्यात एवढं बिघडण्यासारखं काय झालं?" कार्लेकर बाईंनी सुवर्णमध्य काढला.

सखाराम विभूतेच्या तोंडात बसली याचाच आम्हा साऱ्यांना आनंद झाला होता. सेक्रेटरीपणाच्या जोरावर त्यानं रात्री पोरांना फार छळलं होतं. सखारामचा चेहरा पडला होता. गणपुले मास्तर आणि कार्लेकरबाई यांच्यात काही तरी चर्चा झाली. गणपुले मास्तरनी पोरांच्या घोळक्यात उभं राहून सांगायला सुरवात केली.

"आज तुमच्या सेक्रेटरीच्या निष्काळजीपणानं पन्हाळगडची सहल रद्द करावी लागत आहे. ही सहल पुढच्या महिन्यात जाईल. आता थोडा वेळ आपण सारीजणं सांगली शहरातील प्रेक्षणीय स्थळं पाहून येऊ. दुपारच्या जेवणानंतर विश्रांती घेऊन संध्याकाळी म्हाळूपला परत जाऊ. ही सहल पुढच्या महिन्यात जाणार आहे असं घरी सांगा. काय समजलात ?"

सांगली शहर तर आम्हाला तोंडपाठ होतं. पण मास्तरांच्या बरोबर उगाचच भटकून आलो. गणपतीचं देऊळ, आमराई, नदीवरचा पूल इ. बघितलं. दुपारचं जेवण उरकलं. खळ खळलो. संध्याकाळी उन्हं उतरल्यावर म्हाळूपला निघालो. दिवे लागणीला सारीजणं घरी परतलो. सहल पुढे ढकलली आहे एवढं सांगितल्यावर घरच्यांनी पुढं काही विचारलं नाही. त्या काळच्या पालकांपासून आजच्या पालकांनी पण धडा घेण्यासारखा आहे. इतके सरळ पालक होते त्या काळी.

दुसऱ्या दिवशी मास्तर मंडळी व मुलामुलात सहलीबद्दल चर्चा झाली. सहल पुढे ढकलली—गाडी चुकली—इ. इ. बाबींची थोडा वेळ चर्चा झाली. मग सारं गप्प झालं. सहलीची पुढची तारीख जाहीर होईतो वाट पहाण्याखेरीज दुसरा मार्ग नव्हता. आठ-दहा दिवस असेच गेले. मग एक दिवस शाळेची मनापासून झाडलोट झाली. तुळईची कोळीष्टकं काढली गेली. रंगरंगोटी झाली. जागजागी सुभाषितं लावली. इन्स्पेक्शन जवळ आलं की हा ट्रीकसीन होत असे. आणि शेवटी इन्स्पेक्शनचा दिवस उजाडला.

यल्फंडीतली पोरं जरीच्या टोप्या घालून आली. मास्तर मंडळींनी त्यांच्याकडून दाढचा करून घेतल्या. भट्टीचे कपडे घातले. फळयावर कधी नव्हत ते तारीख, हजर मुले, गैरहजर मुले इ. माहिती नोंदविली. कार्लेकरबाई नवी कोरी निळया रंगाची साडी








नेसून आल्या. डेपोटीसाहेब शाळेत आले. त्यांच्या बरोबर एक पट्टेवाला आणखी एक दोन अधिकारी होते. पहिले दोन-तीन वर्ग तपासून झाल्यावर स्वाऱ्या आमच्या वर्गात दाखल झाल्या. गणपुले मास्तर खुर्चीतून उठले. मुलांनी उठून डेपोटीसाहेबांना मानवंदना दिली. डेपोटीसाहेब खुर्चीवर बसले. पट्टेवाल्यानं धावत जाऊन दोन खुर्च्या आणल्या. दोघं अधिकारी स्थानापन्न झाले. गणपुले मास्तर फक्त उभे होते. बाकी सारीजणं बसली होती.

मग डेपोटीसाहेबांनी तपासणी सुरू केली. पहिली गणपुले मास्तरांची झाली मग मुलांच्याकडे मोर्चा वळला. तोंडी गणितं झाली. रेघी गुणाकार झाले. इतिहासातल्या सनावळ्या झाल्या. मग शुद्धलेखन झालं. सगळं सुरळीत चाललं होतं. डेपोटी साहेबांच्या तोंडातून एक दोनदा प्रशंसोद्गार बाहेर पडले. गणपुले मास्तरांचा चेहरा कृतार्थ झाला. डेपोटी साहेब सामान्य ज्ञानाकडे वळले.

"मुलांनो तुम्ही एखाद्या ऐतिहासिक स्थळाला सहलीनिमित्त गेला असाल नाही. म्हणजे तुमची कधी तरी कुठल्या तरी गडावर—किल्ल्यावर सहल गेली असेलच. त्या सहलीचं वर्णन कोण सांगतोय बघू ?" डेपोटीसाहेबांनी प्रश्न केला.

सारी पोरं कोऱ्या पाटीसारखा चेहरा करून बसली.

"अरे असे लाजताय का बायकांसारखे ? उठून उभं राहून सांगा." परत एकदा डेपोटीसाहेबांनी आवाहन केलं. थोडी फार कुजबूज उठली. परत सारं शांत झालं.

"अरे तुमची एकही सहल गेली नाही का कुठल्या गडावर ?" साहेबांचा प्रश्न.

"पन्हाळगडला" जाणार होती पण पुढं ढकलली. सखाराम विभूतेच्या वेंधळेपणानं मोटार चुकली आमची. गणपुले मास्तरनी सखारामच्या मुस्कटात दिली त्याबद्दल." "बबन्यानं थोडक्यात सहलीचं वर्णन केलं. गणपुले व सखाराम दोघांचा चेहरा बघण्यासारखा झाला. एवढ्यात मागच्या बाकावर खाली मुंडी घालून बसलेला मन्या वाणी उठला, अन् म्हणाला

"मी सांगतो आमच्या सहलीची माहिती."

"ये बाळ असा साऱ्यांच्या समोर उभं राहून बोल." डेपोटीसाहेबांनी मन्याला जवळ बोलावलं. मन्या समोर गेला. चड्डी सावरली. शर्ट ठीक केला. नाकावरून मनगट फिरवून मन्यानं बोलायला सुरवात केली.

"आमच्या वर्गाची पन्हाळगडला सहल जाणार होती. प्रत्येकाकडून गणपुले मास्तरांनी तीन तीन रुपये गोळा केले. पहिलीच्या कार्लेकरबाई पण वर्गणी न देता आमच्या बरोबर आल्या. आदले दिवशी संध्याकाळी आम्ही चालत सांगलीला गेलो. आम्हांला मारुतीच्या देवळात थांबवून गणपुले मास्तर कार्लेकरबाईना मामांच्या घरी सोडण्यास गेले. मी दाढ दुखण्याचं निमित्त करून हळुहळू त्यांच्या पाठीमागून गलो. उडप्याच्या हॉटेलात मास्तर व बाई गेल्या. ते अर्ध्या तासाने बाहेर आले. मग दोघजणं मारवाड पेठेत कापडाच्या दुकानात गेले. मी बाहेर चोरून पहात उभा होतो. बाईंनी एक साडी घेतली. आज नेसलेली निळी साडी तीच. गणपुले मास्तरांनी पैसे दिले. तिथून दोघेजणं एका सिनेमाला गेली. सिनेमा सुरू होऊन पुष्कळ वेळ झाला होता. सिनेमा सुटल्यावर दोघेजणं स्टेशन जवळच्या लॉजमध्ये गेले. जाताना दोघं एकमेकाला बिलगून जात होते. गणपुले मास्तर कुजबुजले, "उद्या पोरांना काहीतरी कारण सांगून ट्रीप पुढं ढकलायची. पगार झाला की परत ट्रीप काढायची." बाई पण हसत हसत काही तरी म्हणत होत्या. मास्तर पण चेष्टा करत होते. मी सारं ऐकलं पण सांगता येण्यासारखं नाही. लॉजमध्ये दोघं जण गेले. मी दोन अडीच तास बाहेर झाडाच्या आडोशाला उभा होतो. मला कंटाळा आला म्हणून मी परत मारुतीच्या देवळात आलो. सारी पोरं झोपली होती. मी गपचूप कोपऱ्यात झोपलो. दुसरे दिवशी

### उमजून, समजून

उमजुन मना
काही उमजत नाही.
समजुन सारे
जग समजत नाही !

कधी दिसावी वाभळ
तेजफुलांनी न्हालेली
उरी सलावी वेदना
रक्तस्नात काट्यातली !

कधी जावी नयनांची
झेप अपुऱ्या नभात
कधी पंख जटायूचे
भस्म व्हावे क्षितीजात !

—अंजली फडके

सकाळी मास्तर स्वतः साडेसात वाजता आले. माझ्या पेकाटात लाथ घालून उठवलं. नंतर थोड्या वेळानं सखाराम विभूतेच्या कानफाटात बसली. कार्लेकर बाईंनी उगाचच चुचकारलं. आमची सहल सांगलीतच संपली व आम्ही परत म्हाळूपला आलो." मन्याला बोलून बोलून धाप लागायची वेळ आली. गणपुले मास्तरांचा चेहरा काळवंडला होता.

"म्हणजे तुमची पन्हाळगडची सहल सांगलीतच पुरी झाली म्हणायची." डेप्युटी साहेब खवचटपणे हसत म्हणाले.

"पन्हाळगड नाही तर नाही पण भानगड तरी पहायला मिळाली." मन्या वाणीनं समारोप केला. ● ● ●





अनुक्रमणिका

# सुकान्त चंद्रानना पॅरीस

## लोहगड ते लंडन [ ४ ]

ह. सी. उर्सेकर
ॲडिशनल प्रेसीडेन्सी मॅजिस्ट्रेट



**. . . नेपोलियनच्या तलवारीने जिंकलेले विश्वसाम्राज्य लयाला गेले . . . पण कलावंतांच्या अभिजात कलाकृतींनी जिंकलेले रसिक हृदयसाम्राज्य अजिंक्यच . . .**

पारी ! पॅरीस या नगरीची विलक्षण मोहिनी मानवी मनावर आहे. उभ्या दुनियेच्या संस्कृतीचे माहेरघर, कलाकौशल्याची विलासभूमी, रसिकतेचे नंदनवन, प्रणयाचा कल्पतरू आणि पराक्रमाची वीरभूमी म्हणजे पॅरीस. पॅरीस म्हणजे पुरोगामित्व, अखंड आधुनिकता, नवीन कलाप्रवाह किंवा विचारप्रवाह यांची अतूट गंगोत्री. फॅशन्स् येथे नित्यनवीन निर्माण होतात. फ्रेंच लोक मोठे बुद्धीमान, कल्पक, नवीनतेचे भोक्ते आहेत. आपले जीवनपुष्प जीवनरसाचा आस्वाद घेत फुलवावे कसे हे फ्रेंच लोकांपासूनच शिकावे. जीवन जगणे ही एक कला आहे. अन् त्या कलेचे रसग्रहण करताना निर्माण होणारा जो रस तोच जीवनरस. शृंगार, वीर, करुण वगैरे इतर साहित्यिक रस हे दुय्यम विचारांची व आचारांची बंडखोरी हा जन्मजात स्वभाव-पैलू. मे १९६८ मधील सोर्बोन युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांच्या बंडात त्यांचा पुढारी म्हणाला की विद्यार्थी एफेल टॉवर काबीज करतील. एफेल टॉवर हे खरोखरी फ्रेंच जीवनाचे प्रतीक आहे. जीवनपुष्प आणि आकाशपुष्प यांचा सुरेख संगम म्हणजे पॅरीस. क्षणाक्षणाला नवीन रूप घेणारी ही पॅरीसनगरी कुणाला पाहावीशी वाटणार नाही ?

जनरल द गॉल हे Call to Honour या आपल्या आत्मचरित्रात लिहितात—"नोत्रदाम चर्चवर पांघरुण घालणारी रजनी, व्हर्सायवर विसावणाऱ्या भव्यदिव्य संध्याछाया, विजयद्वारावर तळपणारा सूर्यनारायण, आंवालिद म्युझियममधील नेपोलियनने जिंकलेल्या राष्ट्रध्वजांची केविलवाणी फडफड ह्याच गोष्टी मला फ्रेंच राष्ट्राच्या विभव वैजयंती वाटतात !"

अशा नयनोत्सव पॅरीसला जाण्याचे विमान लंडनहून सकाळी साडेआठला सुटणार होते. इलफोर्ड या लंडनच्या उपनगरातून विमानतळावर जायला भल्या पहाटे निघालो. भू-रेल्वेने हूस्टन ट्यूब स्टेशनवर पोचलो. पण टॅक्सी मिळेना. योग्य वेळी टॅक्सी न मिळणे ही आधुनिक सभ्यतेची खोडच आहे—मग ते ठाकुरद्वार असो वा ट्रॅफल्गार स्क्वेअर असो. पण लंडनमध्ये व मुंबईत एक सोयीस्कर फरक जाणवला. मुंबईचा टॅक्सीवाला त्याला जायचे असेल त्या दिशेला तुम्ही जाणार असाल तरच साधारणपणे प्रवेश देणार, पण लंडनमध्ये मात्र रिकामी टॅक्सी सदैव तुमच्या कामी येणार. टॅक्सीने विमानतळावर पोहोचल्यावर एअर फ्रान्सच्या खात्यात गेलो. त्या ऑफीसरने सांगितले की साडेआठचे विमान मघाच उडाले. पुढे काय ? 'कारण दाखविण्याची नोटीस' न बजावता फ्रेंच गृहस्थाने माझ्या तिकीटावर ८-३० चे ९-३० केले व मेर्सी आभारी आहे म्हणून माझेच आभार मानले. अशा प्रसंगी आपल्याकडे किती अर्ज व फॉर्म लागले असते ह्याची कल्पना आपल्याला आहेच.

### पॅरीस म्हणजे जणू एक परी !

एअर फ्रान्सच्या डौलदार विमानातून इंग्लीश खाडी पार केली. फ्रान्स भूमीचे अविस्मरणीय प्रथम दर्शन घडले ते म्हणजे सूर्यकिरणात न्हाणाऱ्या सेन नदीचे. सेन नदी पॅरीसची मंदाकिनी. तिच्या दोन्ही काठांवर फुललेले पॅरीस म्हणजे नाचती, बोलती, गाती अशी एक नवयौवना परी आहे. या अप्सरेचे नेत्र शँपेनने धुंद आहेत, तिला काव्याचे पंख फुटलेत व करकमलात चित्रकाराचा कुंचला आहे.










सेन नदीवरील पूल हे तिच्या केसांच्या सोनेरी वटा. आणि या देवांगनेच्या माथ्यावर शोभतोय एफेल् टॉवरचा राजमुकुट ! सेनचे महत्त्व पॅरीस नगरपालिकेनेही जाणल्यामुळे घरांचे नंबर नदीपासून एक, दोन, तीन असे सुरू होतात. इतकी ही नदी नागरी जीवनाशी निगडीत आहे.

आधीच उल्हास आणि त्यात ग्रीष्म ! सूर्यस्नात पॅरीसमध्ये उल्हास उतू चालला होता. हॉटेल आरक्षण आधी न केल्यामुळे कुठे जावे हा पहिला प्रश्न पडला. एअर फ्रान्सच्या कचेरीद्वारा अखेर लॅटीन क्वार्टरमध्ये ओतेल द्यु प्रोग्रेसमध्ये एक खोली मिळाली. ब्रेकफास्टसह राहाण्याचे साडेसोळा फ्रेंच फ्रँक्स. एक व्यवहार-कुशल फ्रेंच विधवा स्त्रीने आपल्या स्वरूपसुंदर मुलाच्या साहाय्याने हे हॉटेल चालवले आहे. काश्मीरात भीक मागणारी पोरेसुद्धा काश्मिरी गुलाबासारखी लालबुंद सुंदर पाहिल्याचे मला आठवले. तेथे अनुभव आला होता की सगळेच सौंदर्याला भीक घालतात असे नाही ! तो फ्रेंच मुलगा इतका देखणा होता की सकाळी ब्रेकफास्ट घेऊन येताच चित्रातला देवदूत आल्यासारखे भासे. त्या फ्रेंच महि-लेला थोडेसे इंग्रजी येत होते पण मुलाला मात्र मुळीच येत नव्हते. माझ्या तुटपुंज्या फ्रेंचच्या ज्ञानावर मी वेळ भागवून नेत असे.

## फिरत्या रस्त्याचे दर्शन

लंडनप्रमाणे पॅरीसमध्येही विजेची भू-रेल्वे-मेट्रो आहे. ती आता जुनी झाली आहे. लंडनच्या ट्यूबइतकी जलद जात नाही, पण पॅरीस पाहायला ते एक सोयीस्कर व स्वस्त वाहन आहे. या भुयारी रेल्वेचे वैशिष्ट्य म्हणजे तुम्ही कुठेही जा, दुसऱ्या वर्गाचे तिकीट सहा फ्रेंच फ्रँक तर पहिल्या वर्गाचे नऊ फ्रँक. पहिल्या वर्गाचा एकमेव लाल डबा आपल्या इकडील पोस्टाच्या आर्. आम्. एस्. डब्यासारखा असतो. हिरव्या रंगाच्या दुसऱ्या वर्गाच्या डब्यांच्या मधोमध तो जोडला जातो. स्टेशनात शिरताना स्त्री तिकीटचेकर लोखंडी दारात बसून कडक तपासणी करतात. सबंध दिवस त्या तिकिटावर कुठच्याही गाडीने यथेच्छ हिंडावे पण स्टेशनबाहेर आलात की संपले तिकीट. दहा तिकीटांचे एक चोपडे एकदम घेतल्यास स्वस्त पडते. सकाळी आठपर्यंत दुसऱ्या वर्गाचे तिकीट पहिल्या वर्गातही चालते. कारण पहिल्या वर्गाचे सुखासीन पॅसिंजर लोक आठच्या आत उठतच नाहीत. (मुंबईत मात्र दुधवालेही पहिल्या वर्गाने पहाटेसुद्धा जातात) गाडी धाडधाड आवाज करीत स्टेशनात शिरते–आपोआप दारे उघडतात–आपोआप बंद. एकदा एका निग्रो प्रवाशाचा कोट दारात अडकून राहिला. झाले पुढील स्टेशन येऊन आपोआप दार उघडेपर्यंत त्या प्रवाशाला बाकावर जागा असूनही, सीलबंद उभे रहावे लागले. गाडीत कुणी कुणाशी बोलत नाही; पण निःशब्द शृंगारचेष्टा अगदी निःसंकोच चालू असतात. या भुयारी रेल्वेत लाईन बदलताना, एका स्टेशनावरून दुसऱ्याकडे जाताना, सुमारे एक फर्लांग फिरता पट्टा आहे. त्यावर



**पॅरीसची परी !**

उभे राहिले की आपण आपोआप पुढे सरकतो. फिरता जिना पाहिला होता, पण फिरता रस्ता–पॅरीसमध्येच.

## नेपोलियनचे वीर-स्मारक

प्रोग्रेस हॉटेलपासून लक्झेंबर्ग मेट्रो स्टेशन जवळच होते. तेथून एत्वाल स्टेशनला गेलो. सायंकाळी पाचाचा सुमार होता. पॅरीस-मधील आर्क-द-त्रिऑंफ्वर द गॉलनी म्हटल्याप्रमाणे सूर्य तळपत होता. मुंबईच्या गेटवेचा भास झाला. मुंबईचे भारतद्वार दिल्लीच्या कॅनॉट सर्कलमध्ये उभे केले तर त्याची कल्पना येईल. पण हे विजयद्वार फार प्रचंड आहे. १६४ फूट उंचीचे हे स्मारक नेपोलियनने फ्रेंच





अनुक्रमणिका

सैन्याचे विजय चिरस्थायी करण्यासाठी उभारले. या चौकाचे नाव एत्वाल किंवा तारा. मुंबईला सात रस्ताच आहे तर हा बारा शलाकांचा–रस्त्यांचा–तारा आहे. कारण नेपोलियनने बारा स्वाऱ्या करून शत्रूचे बारा वेळा बारा वाजवल्याचे हे वीर स्मारक आहे. या स्मारकाभोवती फरेंच सेना व सेनानींचे भले मोठे पुतळे आहेत. शालग्रे ह्या फरेंच शिल्पकाराने फरान्सचा राष्ट्रवीर नेपोलियन याजवर रचलेले दगड़ातले महाकाव्यच हे ! अज्ञात सैनिकांच्या ज्वलंत स्मरणार्थ या विजयद्वारात एक अखंड त्यागाची ज्योत तेवत असते. हे विजयद्वार म्हणजे फरान्सच्या अस्मितेचे, स्वातंत्र्याचे प्रतीक आहे, स्वाभिमानी राष्ट्राच्या वीर पुरुषांच्या पराक्रमाचे पूजास्थान आहे. पॅरीसला सुमारे २००० वर्षांची पूर्वपरंपरा आहे. रोमन लोकांच्या काळी त्याचे नाव होते ल्युतेतीया. इसवी सनाच्या चौथ्या शतकात पारीसी या केल्टीक जमातीच्या नावामुळे पॅरीस असे नाव त्याला पडले. फरान्सच्या साडेचार कोटी वस्तीपैकी सुमारे तीस लाख लोकांचे हे शहर जगात नाव गाजवून आहे. संख्येवर सामर्थ्य अवलंबून नसते हेच खरे. मुंबईचे भारतद्वार हे एका अर्थी सागरद्वार पण आहे. पण पॅरीसचे हे विजयद्वार हे स्वर्गद्वार आहे. ताऱ्यावर त्याचे अधिष्ठान आहे. त्याचे पुढे पूर्वेकडे जो रस्ता अंथरला आहे तोच विश्वविख्यात शाँजेलीजे म्हणजे स्वर्गभूमी. अडीच मैल लांबलचक आहे तो. दोन्ही बाजूला जगातील सर्वात फॅशनेबल अद्यावत् बाजारपेठ आहे. फरान्समध्ये दोनशे फॅशन निर्माते आहेत. रमणींची वस्त्रे, अलंकार, हॅट, फर्स, काय नाना तऱ्हा येथे क्षणोक्षणी बदलतात. नाताळच्या आधी निर्माण झालेल्या नव्या तऱ्हा सर्व जगात जाऊन नव्या वर्षाच्या आत मान्यता पावतात. येथे पायाने हिंडण्यातच खरी मौज आहे. सोन्याचे, हिऱ्यामोत्यांचे अलंकार पाहून मानापमानातील लक्ष्मीधराचा सुद्धा गर्व उतरला असता. दुकानात टांगलेले पिंक कोट म्हणजे फॅशनचे कोमल कळसच होत. पॅरीसचे वैशिष्टय म्हणजे येथे शिप्याच्या कटवर–बॅंकरेटमध्ये कट झाल्यास ज्याप्रमाणे होते तशी, बौद्धीक चर्चा होते. पॅरीसमधल्या पहिल्या रात्री पायी हिंडताना लिडो हॉटेलपाशी मोठा थोरला बघ्यांचा जमाव दिसला. चौकशी करता कळले की मॉरीस शेवालीए या प्रसिद्ध फरेंच विनोदी रंगमूर्तीचा ८० वा वाढदिवस समारंभ आयोजित केला आहे. एखादी बऱ्यापैकी–फराँसच्या मापाने–बडी गाडी दिसली की व्हॉला-व्हॉला (तो पहा, तो पहा) असे फरेंच रसिक स्त्री पुरुष ओरडत, टाळ्या वाजवत. पण निघायचा कुणी तरी दुसराच. मुंबईत फिल्म फेअर अॅवॉर्डच्या वेळचा उत्साह मला येथे दिसला. फरेंच पोलीस शिट्या वाजवून गर्दीला कह्यात राखत होते; पण यात ही एक नागरी आंतरिक शिस्त होती. समुत्सुक रसिकतेने सुव्यवस्थेची चौकट तोडली नाही. मध्येच टाळ्या वाजवून टाचा उंचावून लोक पहायला लागले. क्लॉदेत फोलवर्ट (६२) ही माजी प्रणयसुंदरी आली. नोएल कॉवर्ड हे इंग्लीश नाटककार पण आले. अखेर रात्री १० च्या सुमारास उत्सवमूर्ती, रूपेरी केसांचे चिरतरुण मॉरीस शेवालीए स्मित करीत आले. फरांसस्वारचा अंक दुसऱ्या दिवशी मी मुद्दाम विकत घेतला. त्यात चार मेणबत्त्या ओठांचा चंबू करून फुंकरेने विझवताना त्या विनोद महर्षीचा फोटो पहायला मिळाला. ऐंशीवा वाढदिवस आणि मेणबत्त्या चारच, कारण प्रत्येक मेणशलाका म्हणजे वीस वर्षे असा खुलासा वाचायास मिळाल्याने समाधान झाले. वृद्धपणी ऐंशी वेळा फुंकर घालण्याला कसली छाती पाहिजे. फरेंचांच्या फुंकर नियोजनाचे कौतुक वाटले !

## हॉटेलात पाण्यासाठीही पैसे

शाँजेलीजे रस्ता म्हणजे सगळयात महागडा. मुंबईत एक ते तीन ग्रेडची हॉटेले आहेत. त्यात पहिल्या ग्रेडचे सर्वात महाग. पॅरीसात चारस्टारचे हॉटेल म्हणजे अमर्यादित महागाई ! एका अंडयाच्या छोटया आम्लेटला नऊ रुपये पडले, बटाटा चिप्स्ना ११ रुपये, पिण्याचे पाणी मागितले तर वेटरने डोळे विस्मयाने वटारले. बाजूला शॅंपेनची बूचे उडताना पाणी मागणारा मी म्हणजे श्रीखंडाच्या फीस्टच्या दिवशी आमटी पिणारा ठरलो. साधे पाणी तर नव्हतेच, मग डिस्टील्ड वॉटरची बाटली वेटरने पुढे आणून ठेवली. त्याचे बिल लावले चार रुपये. मुंबईला चार रुपयाचे श्रीखंड एकट्याला एका वेळी संपले नसते. येथील हॉटेलातील एक वैशिष्टय म्हणजे तुम्ही खुर्चीवर बसून खाल्लेत तर पंधरा टक्के जादा किंमत द्यावी लागते. शिवाय १२ टक्के सर्वीस चार्जेस आणि टीप द्यावी लागतेच. पॅरीसमध्ये बसही महागच आहे. सुमारे एक मैलाला २ रुपये तिकीट पडले. टॅक्सी ड्राइव्हर येथे पुष्कळशा स्त्रियाच आहेत. त्या गाड्या अशा डौलात चालवतात की वाटते आपण कोणी महाराज आहोत, निदान एअर इंडियाचे तरी ! टॅक्सीचे भाडे अधिक पंधरा टक्के टीप द्यावी लागते. त्याला फरेंच भाषेत Pourboir म्हणजे पिण्याकरिता चिरीमिरी म्हणतात. यावरून राष्ट्राची संस्कृती काही

शव्दात कशी प्रकट होते ते दिसून येते. आपल्याकडील सोवळे, उप्टे हे शव्द भारतीय संस्कृतीचे प्रतिनिधीभूत मानले पाहिजेत. पण चांगल्या गोष्टी महागच असतात.

रात्री १ वाजता हॉटेलात डिनर घेतले. मंजुळ संगीत चालू होते. गरम टोमॅटो सूप रवडीसारखे घट्ट व चवदार होते. विविध फॅशनने नटलेले यौवन भोवती फुललेले होते. रात्र जसजशी वाढू लागली तसतशी गर्दीही वाढू लागली. जीवनात दुःख नाही असा मानवी समाज पहायचा असेल तर पॅरीसला जावे. भूवरील दुसरा स्वर्ग कोणता. दिल्लीच्या लाल किल्यात पर्शियन कवीने दिवाण-इ-खासमध्येच स्वर्ग आहे असे म्हणून त्रिवार वजावले आहे. तो मोंगली वेहस्त इतिहासजमा झाला आहे. तरी पॅरीसचा भू-स्वर्ग रोज रात्री फुलत असतो. कारण स्वर्ग म्हणजे आनंदभूमी !

दुसऱ्या दिवशी कॉफी, केकचे ब्रेकफास्ट घेऊन माझ्या हॉटेला-शेजारील पॅरीसची विख्यात सोरवॉर्न युनिव्हर्सिटी पाहायला गेलो. रसिकतेप्रमाणे पॅरीस हे विद्येचेही माहेरघर आहे. तेराव्या शतकात रॉवर्ट सोरवॉन या धर्मोपदेशकाने गरीव विद्यार्थ्यांसाठी एक धार्मिक कॉलेज काढले. आज येथे हजारो विद्यार्थी शिकत आहेत. या विद्यापीठाला २ म्युझियम व २४० प्रयोगशाळा आहेत. २२ अॅंफीथिएटर्स आहेत. ह्याना रिशीन्यु, देकार्त वगैरे थोर पुरुषांची नांवे दिली आहेत. युनिव्हर्सिटीच्या प्रवेशद्वारासमोर कॉम्पत या तत्त्वज्ञाचा विचारमग्न अर्धपुतळा आहे. पुढे प्रांगणात प्रसिद्ध उपन्यासकार ह्यूगो व शास्त्रज्ञ पाश्चर यांचे जातिवंत पुतळे विद्यार्थ्यांस अखंड स्फूर्ती देतात. येथील लायब्ररीत पाऊल टाकताच मुंवई युनिव्हर्सिटीची लायब्ररीची स्मृती चाळवली. प्रचंड, प्रगाढ आणि तपोवन सुलभ ज्ञानसाधनेस आवश्यक असे वातावरण ! सोरवॉन-मध्येच नवविचारांचे अग्नीस्फुल्लींग उडत असतात.

संध्याकाळी लॅटिन् क्वॉर्टरमध्येच हिंडून विद्यार्थीजीवन निरखले. या विभागाला लॅटिन क्वार्टर् नाव पडण्याचे कारण म्हणजे फरेंच राज्यक्रांतीपर्यंत (१७८९) युनिव्हर्सिटीची भाषा लॅटीन होती. प्राध्यापक व विद्यार्थी लॅटिनमध्येच वोलत. युनिव्हर्सिटीच्या आसपास लॅक्झेंवर्ग ही नेटकी अफाट वाग मोकाट विद्यार्थ्यांचे रंजनस्थान वनली आहे.

## सुरासुरांमधील फरक

संध्याकाळी हॉटेलवर दमूनच परत आलो कारण सर्व भ्रमंती आज पायीच केली होती. पाय हाच प्रवासाचा खरा पाया होय ! रात्रीच्या जेवणास जायला वेळ असल्याने हॉटेल लुंजमध्ये रेंगाळलो. काळाकुळकुळीत सुंदर पिआनो दिसला. काळेपणातही सौंदर्याची चमक असू शकते ! पिआनोवर सिनेमातली काही गाणी मी वाजवून पाहिली. नाट्यसंगीत वाजवताना मात्र काही सूर पिआनोत लागेनात. सगळे सूर सारखे असते तर पौर्वात्य व पाश्चिमात्य असा भेदच राहिला नसता. मग ते संगीत असो वा संस्कृती ! भारतीय संगीत ऐकून काही आशियाई हॉटेल पॅसेंजरना घरची याद आली असे त्यांनी माझ्या कानावर घातले. नंतर एकाने युरोपीय संगीत पिआनोवर वाजवले. वातावरण धुंद झाले.

त्याच संगीताच्या मूडमध्ये रात्रीचे–काळोखातले नव्हे–पॅरीस पाह्यला एका पॅरीसी रातराणीने गेलो. त्या वसमध्ये जगातील अनेक राष्ट्रातील स्त्रीपुरुष उत्साहाने वसले होते. एक फरेंच गाईड फरेंचमध्ये व इंग्रजीत धावते मार्गदर्शन करीत होता. तो मध्येच विनोद करी ! विनोद हा फरेंचांचा दुसरा स्वभावच आहे. फरेंच शिकाऊ पुस्तकातील धड्यातही मला प्रत्येक धड्यात काहीतरी चमक आढळलीच होती. तोच अनुभव पॅरीसमध्ये आला.

मूलॉंरूजच्या निशाखान्यात ( Night Club ) जगातले सौंदर्य, यौवन आणि आनंद ठासून भरले होते. प्रवेशद्वारावरील लाल पवनचक्कीने आतील हवापाण्याची आधीच कल्पना आली. रंग-मंचावर निरनिराळे देखावे दाखविण्यात आले. अचानक एक काचेचे घर रामपुरी चाकूच्या पात्यासारखे लक्कन वर आले. त्यात एका जलपरीने पाण्याच्या पोटात पोहून आपले जलतरण कौशल्य दाखविले. नंतर ते घर अचानक वसले व रंगमंचाच्या वरच्या मजल्यावर पाण्याचा प्रचंड धवधवा खाली पडू लागला. त्यातून काही पोहणाऱ्यांनी धडाधड उड्या मारल्या व ते रंगमंचाच्या पोटात अदृश्य झाले. रंगमंचावर मध्येच सर्कस दाखविली. जिवंत वाघ, त्याच्यासमोर तोफ उडवली. कॅन कॅन हे लयकारीचे वहारदार नयनमनोहर नृत्य दाखविण्यात आले. त्यातील नाजुक टाळ्यांचा ताल व ओ ओ असा कोकिळकंठी सौंदर्य सीत्कार कॅन-कॅन चित्रपटात ऐकलेच होते. आज प्रत्यक्ष ऐकले. अखेर प्रेक्षकांच्या डोक्यावरून कुठून तरी दोरीवरून पऱ्या आल्या आणि रंगीबेरंगी फुगे सोडून हा




"भारताचे सत्याधिष्ठीत प्रजासत्ताक"

सर्व देखावा म्हणजे शेक्सपीयरचे 'टॅंपेस्ट' नाटकात प्रॉस्पेरो म्हणतो तशी क्षणसृष्टी आहे असे सुचविले.

दुसऱ्या दिवशी सिटीरामा या काचेरी दुमजली आरामबसने पॅरीसमधील प्रेक्षणीय स्थळे पाहिली. या आरामगाडीत बसल्या बैठकीवरून आठ भाषात – त्यात जपानीही आहे–धावती टीका आपण कर्णयंत्राच्या साहाय्याने ऐकू शकतो. ही दर्शन-भाष्ये रेकॉर्ड करून ठेविली आहेत. मध्येच कोक देण्यात आला. आम्हाला वाटले फुकट म्हणजे बसच्या भाड्यातच असेल म्हणून, मेर्सी बोकू तोंडभर म्हणालो. जरा वेळाने कोक-बाटली परत करताना चार रुपये मागितले. स्मितमुखाने आणि उसन्या स्मिताने ते दिले.

## सेन नदीवरील नववा पूल

सेननदीच्या काठावर बहुतेक प्रेक्षणीय स्थळे आहेत. नदीवरील पूल हे येथील वैशिष्टच आहे. त्यात नववा पूल फार प्रसिद्ध आहे. सिटीरामाचा बस-भ्रमर पुलापुलावरून जाऊन पॅरीसचा मधु लुटवीत होता. विजयद्वाराजवळून बस जाताना आम्हांला व्हिक्टर ह्यूगोचा एक परिच्छेद ऐकवण्यात आला. सम्राट नेपोलियनचा देह येथे ठेवण्यात आला होता व त्याच्याभोवती त्याने जिंकलेल्या राष्ट्रांच्या अनेक हतबल ध्वजांचा ढिगारा त्याला मानवंदना देत होता.

नेपोलियन हा फरान्सचा राष्ट्रपुरुष. यंदा त्याच्या जन्माची द्विशताब्दी आहे. बावन्न वर्षांच्या अर्धशतकात त्याने रणांगणावर विजयाची नेत्रदीपक शतके काढली. जनरल मॉंटगोमेरीने लिहिलेल्या युद्धशास्त्राच्या इतिहासात नेपोलियनच्या बरोबरीचे सेनापती जगाच्या इतिहासात झाले असतील पण त्याच्यापेक्षा सरस सेनापती झाला नाही असे मत नमूद केले आहे. याच पुस्तकात पहिल्या बाजी-रावाने पालशेत-स्वारीत निजामाविरुद्ध दाखविलेल्या युद्ध नेतृत्वाचा गौरव केलेला आढळतो. नेपोलियनने उभारलेल्या विजय-द्वारापलिकडे दूरवर प्लास व्हॉंदाम या प्रशस्त चौकात १४४ फूट उंचीच्या स्तंभावर नेपोलियनचा पुतळा उभा आहे. हा स्तंभ नेपो-लियनने ऑस्ट्रेलिट्झ्च्या लढाईत जिंकलेल्या १२०० तोफा वितळून ओतला आहे.

सेन नदीच्या तटावरच ऑंवालीद येथे सम्राट नेपोलियनचा मकबरा आहे. एकातएक ठेवलेल्या सहा पेटयांमध्ये हा सेनानी विश्रांती घेत आहे. या फरेंच सम्राटाने फरान्सला पुष्कळ गोष्टी दिल्या. कोडनेपोलियन या नेपोलियन स्मृतीत फरान्सचे कायदे एकत्र आणले. शिक्षणात सुधारणा केली. जनतेवर त्याचे प्रेम होते म्हणून जनतेची भरभराट हाच त्याचा राज्यमंत्र होता.

या स्मारकामागे जगविख्यात आर्मी म्युझियम आहे. इति-हासाच्या सुरुवातीपासूनची शस्त्रे, अस्त्रे व संरक्षण साधने येथे ठेवलेली आहेत. भारतात दोन नळीच्याच बंदूका मी पाहिल्या होत्या. येथे तीन नळींचीच काय सहा नळींची प्रचंड बंदुक दिसली.

नेपोलियन कीर्तीने उंच असला तरी उंचीने थिटा होता. सेंट हेलीनामधील त्याची छोटी कॉट हेच दाखवते. या म्युझियममध्ये नेपोलियनने ऑस्ट्रेलिटच्या लढाईत वापरलेली तलवार जतन करून ठेवलेली आहे. नेपोलियनच्या सैन्याचे रणक्षेत्रांचे विविध व्यूह पाहायला मिळतात. प्रत्येक सैनिकी अधिकाऱ्यांने हे म्युझियम अवश्य अभ्यासले पाहिजे.

शांजेलिजे या अमरभूमीच्या टोकाला प्लास द कॉंकार्द हा ८५००० चौरस यार्डाचा चौक म्हणजे माजी मरणभूमी आहे. फरेंच राज्यक्रांतीच्या वेळी येथे गिलोटीनवर फरान्सचा राजा सोळावा लुई याचा वध करण्यात आला. आज मात्र हे आनंदवन आहे. संध्या-काळी सव्वा सात वाजता क्षणात सूर्य मेघातून बाहेर येऊन अचानक प्रकाश पडावा तसे येथे हजारो दिवे एकदम लागले. ती नेत्रदीपक शोभा डोळ्यानाच कळेल–वाचून नव्हे, प्रत्यक्ष पाहून ! राजाप्रमाणे पॅरीसलाही दिवाळी काय रोजचीच !

## माणसे पार्क करण्याचे भाडे

दमून भागून पलिकडे त्युलेरी बागेत शिरलो. चेस्टनटची डेरेदार झाडे डौलाने वायूच्या मंद लहरींवर माफक हालत होती. छोटया तलावाच्या काठी गंजलेल्या लोखंडी खुर्च्या पाहून मी व माझा मित्र विश्रांतीसाठी बसलो. जलस्तंभाचा फवारा उंच उडत होता. मी भाष्य केले 'नेहमी आकाश पृथ्वीला पाणी पाजते, येथे धरती आकाशाला पाणी पाजीत आहे.' इतक्यात एक वृद्ध फरेंच बाई बसच्या कंडक्टरसारखी पेटी गळचात अडकवून आली व ४५ सेंट म्हणजे सुमारे एक रुपया मागितला तिने. गंजलेल्या खुर्चीचे भाडे ! मोटारी पार्क करण्याकरता वेळेप्रमाणे पैसे द्यावे लागतात, हे लंडन-मध्ये पाहिले होते. येथे माणसे पार्क करण्याकरताही पैसे द्यावे लागले. एकंदर पॅरीसला हवेशिवाय काहीही विनामूल्य–पाणीसुद्धा–मिळत नाही ! आधुनिक संस्कृतीचे मोल पॅरीसलाच पटते !

दुसरे दिवशी सकाळी नोत्रदाम हे नोत्रदामचा कुबडा ह्या फिल्ममध्ये पाहिलेले एखाद्या उत्तुंग कोरीव लेण्याप्रमाणे दिसणारे चर्च पाहिले. हे चर्च बांधण्याचे काम सुमारे दोनशे वर्षे चालले होते. शास्त्राने कलेची पिछेहाट केली असली तरी कलेने धर्माला चिरंजीव केले आहे. मायकेल अँजेलोने रोमचे सेंट पीटर्सच्या जगप्रसिद्ध चर्चमध्ये आपली कला बेबंद उधळली आहे.

जगातल्या कलावंतांची काशी म्हणजे लूव्हची विश्वविख्यात चित्रशाळा ! चौदाव्या लुईचा हा मूळचा राजवाडा जगातील चित्रकारांनी नटवलेले सौंदर्यवन आहे. पाश्चिमात्य व पौर्वात्य खोद-कला, शिल्पकला, चित्रकला यांचे इतके अस्सल सुविहित प्रदर्शन जगात कुठेही नाही. कालखंडाप्रमाणे कलाकृतींची आरास केली आहे. ग्रीक कालखंडात होमरचा छोटा बस्ट आहे. ॲफ्रोडाईट देवतेने (रति) चक्क भारतीय अंबाडा घातला आहे. भग्नहस्त व्हीनस दी मिलोचे स्वर्गीय लावण्य अलौकिक आहे. रस्किनने शिल्पकला म्हणजे गोठलेले संगीत (Frozen Music) म्हटले आहे त्याची मला आठवण झाली. उच्च शिल्पकृतीत सुरेलपण, लय व रस हे संगीताचे गुण जरूर प्रतीत होतात.




## कलावंतांच्या चिरंतन कलाकृती

इजिप्तच्या विभागात एक 'सच्चिदानंदबावा आदरे लेकरु जहाला' अशा छापाचा इजिप्शीयन लेखक आसनमांडी घालून 'हं, सांगा पुढे'च्या पवित्र्यात बसला आहे; सोळाव्या शतकातली एक शिल्पकृती वेड लावणारी आहे. एक दंगेखोर पोरगे स्वतःच्या पायातील काटा काढण्यात दंग आहे. हे दृश्य आपल्या अंगावर काटा आणते. बायबलातील कथा-गाथांवर अनेक पेंटीग्ज् आहेत. नेपोलियनला नोत्रदाम चर्चमध्ये राज्याभिषेक झाला त्याचे डेविडने केलेले प्रचंड पेंटिंग म्हणजे ऐतिहासिक चित्रकलेचा प्रातिनिधीक नमुना आहे. फ्रेंच, इटालियन, फ्लेमीश, इंग्लीश कलाकारांचे येथे आंतरराष्ट्रीय कला-संमेलनच भरले आहे. या चित्रप्रदर्शनातला कोहीनूर म्हणजे लियोनार्द दी विंची ची मोनालीसा ! चंद्रमुख, चाफेकळी नाक, भावुक नेत्र व जगज्जेते गोड हास्य ! नेपोलियनच्या तरवारीने जिंकलेले विश्वसाम्राज्य लयाला गेले, पण कलावंतांच्या कुंचल्याने जिंकलेले हृदय साम्राज्य अजिंक्य आहे.

लूव्हे चित्रशाळा कलावंतांची काशी आहे तर पॅरीसचे ऑपेरा हाऊस नाटयगृह त्यांचे प्रयाग आहे. ही प्रचंड इमारत सोनेरी आहे. चार्ल्स् गार्नीचा सोनेरी पुतळा नाटयगृहासमोर उभारला आहे. त्याच्या भोवती संगीत व नृत्य देवतांच्या शिल्पकृती आहेत. मुंबईच्या ऑपेरा हाऊससमोर नटसम्राट बाल गंधर्वाचा पुतळा असावा ह्या माझ्या मनाला येथे पुष्टी मिळाली !

शास्त्र, कला याप्रमाणे न्यायदेवतेलाही राजवाडयातच जागा देण्यात आली आहे. न्यायमंदिराला न्यायप्रासाद म्हणतात. ही इमारत फार प्रचंड आहे. स्वातंत्र्य, समता व बंधुता हे फ्रेंच न्यायदेवतेचे ब्रीदवाक्य दर्शनी खोदलेले आहे. येथे गंमत म्हणजे कान-गाईड आहे. पैसे टाकले की सर्व माहिती मशीन बोलू लागते. ज्ञानेश्वरांनी सजीव रेडयालाच बोलते केले, आपल्याला येथे निर्जीव यंत्राला बोलते करण्याची प्रौढी मिरवता येण्याची स्वस्त सोय आहे. फरान्सच्या न्यायदान व्यवस्थेचे वैशिष्टय म्हणजे सरकारी नोकरांनी गुन्हे केल्यास त्यांची चौकशी करण्यासाठी स्वतंत्र कोर्टे आहेत.

मोमात्र म्हणजे पॅरीसची मलबारहिल. आपल्याला माहीत असलेले प्लॅस्टर ऑफ पॅरीस या टेकडीमध्ये गेल्या शतकापर्यंत सापडत होते. पॅरीसचे विहंगमावलोकन येथून करता येते. म्हणून कलाकार येथे राहतात. मॉडर्न आर्टचा उद्गाता पिकासो हा कलावंत याच टेकडीवर राहात असे.

मोमांत्र प्रमाणेच पॅरीसचे सम्यक् दर्शन घडविणारे उच्च स्थान म्हणजे एफेल् टॉवर. फ्रेंच कलावंताप्रमाणे फ्रेंच स्थापत्य-विशारदही कर्तृत्वाने अजोड आहेत. सुवेजचा कालवा तयार करणारा लेसेप्स हा फ्रेंच इंजिनियरच होता. एफेल स्तंभ १००६ फूट उंच आहे. हे एक पोलादी महाकाव्यच आहे. प्रचंड लिफ्टने आम्हाला फक्त ३७७ फूट उंचीपर्यंतच जाऊ दिले. वर हॉटेल, फोटोग्रॉफर सर्व आहे. विजयद्वार हे पॅरीसच्या भूतकाळाचे स्मारक मानले तर, एफेल टॉवर हे फरान्सच्या भविष्यकाळचे उत्तुंग स्वप्न आहे. बिरहाकीम स्टेशनवरून भू-रेल्वेतून जाताना रात्री याची शोभा अवर्णनीय दिसते. पहिल्या व दुसऱ्या मजल्यावरचे दोन विजेच्या दिव्यांचे कमरपट्टे म्हणजे पॅरीसनगरीचे रत्नजडीत अलंकारच होत.

पुस्तके, पूल व सौंदर्यवती (Books, bridges and belles) म्हणजे पॅरीसनगरी. सेन नदीच्या काठी पुस्तकांची अपार दुकाने आहेत. पुस्तके विकत घेऊन फरेंच लोक वाचतात. तुम्हाला काय माहीत आहे या नावाने १३०० पुस्तकांची स्वस्त सामान्यज्ञान माला फरेंचमध्ये उपलब्ध आहे. याची सूची मी मुद्दाम मिळविली.

कला, शास्त्र, ज्ञान ह्यांनीच संस्कृतीचे रसायन तयार होते. या भूमीवर चंद्राची चित्रे काढणारे कलावंत, चंद्रावर स्वारी करण्याची कुवत असलेले शास्त्रज्ञ आहेत तशा चंद्राननाही ! किंबहुना पॅरीसनगरी हीच एक सुकांत चंद्रानना आहे.

(क्रमशः)










दिवाळीत योजिलेल्या विनोदी साहित्य स्पर्धेतील तिसऱ्या पारितोषिकाची कथा

# विनयभंग



—पंडित क्षीरसागर

राजाराम हा साधा पोलीस होता. तो आता कुलकर्णी पोलीस इन्स्पेक्टरांना भेटायला चालला होता. आपली इच्छा पुरी होऊ दे अशी तो मनात परमेश्वराची प्रार्थना करीत होता.

गावात हल्ली विनयभंगाचे प्रकार फार घडू लागले होते. पान खाऊन स्त्रियांच्या अंगावर रंगीत पिचकारी मारून दुचाकीवाले गुंड खुशाल पुढे सटकत होते. काही काही सायकलवाले एकट्या-दुकट्या स्त्रीच्या खांद्यावर हात ठेवून अश्लील बोलून सायकल दामटीत होते. शाळा कॉलेजपुढे टारगट व मवाली मुलांचे घोळके उभे रहात होते व मुलींच्या कुचाळक्या करीत पाठलाग करीत होते. भडक रंगाचे व चित्रविचित्र मॅनिले, ड्रेनपाईप पँट, टोकदार बूट व केसांचे कोंबडे काढणारे अनेक उल्लूके पठ्ठे स्त्रियांना येता जाता त्रास देत होते.

यांबद्दल वर्तमानपत्रात फारच ओरड सुरू झाली होती. 'पोलीस खाते झोपले काय ?' असा सवाल वृत्तपत्र करीत होती. फुटपाथवरून न चालणाऱ्या व दिवा न लावता सायकलवरून जाणाऱ्या गरीब जनतेला त्रास द्यायचे एवढेच पोलीस खात्याचे काम दिसते असे वर्तमानपत्रांच्या वाचकांच्या पत्रव्यवहारात लोक लिहित होते. तशात गणपती बसल्याने दहा दिवस मवाली लोकांच्या चाळयांना ऊत येणार, तरी पोलीस खात्याने वेळीच उपाययोजना करावी असे लोक लिहित होते.

यांचा योग्य तो परिणाम झाला होता. विनयभंगाच्या तक्रारी घडू नये म्हणून खास पोलीस दलाची स्थापना झाली होती व तसे वर्तमानपत्रात जाहीर करण्यात आले होते. खास पोलीस दलाचे इन्स्पेक्टर म्हणून श्री. कुलकर्णी यांची नेमणूक झाली होती. कुलकर्णी आज पोलीसातले काही लोक निवडून घेणार होते व कामाची पद्धत समजावून सांगणार होते. त्या खास पोलीसदलात आपल्याला घ्यावे म्हणून राजाराम कुलकर्णी इन्स्पेक्टरांना भेटण्यास चालला होता.

राजाराम पोलीसात भरती झाल्याला बरीच वर्षे झाली होती. पण त्याला अजून बढती मिळाली नव्हती. त्याने खूप प्रयत्न केले; पण त्याला कधी साधा भुरटा चोरही सापडला नाही. इतर त्याचे मित्र पोलीस दारूबंदीमुळे हप्ते घेत असत व सुखात रहात असत. पण राजारामला तेही जमत नव्हते. राजाराम पोलीस क्वार्टर्समध्ये रहात होता. त्याच्या शेजारच्या पोलिसांची आर्थिक परिस्थिती उत्तम होती. पण राजारामला या महिन्याची त्या महिन्याला कड गाठताना नाकी नऊ येत होते. त्याच्या शेजारचा सखाराम पोलीस हा त्याच्या देखत फेरीवाल्याकडून रुपया, दोन रुपये घेऊन महिना अखेरीससुद्धा चांगल्या स्थितीत रहात असे. पण राजारामला कुठल्याही फेरीवाल्याने अजून दहा पैसे सुद्धा दिले नव्हते. सखाराम तर त्याला कित्येकदा हेटाळणीने म्हणत असे, 'अरे तू पोलीसखात्यात शिपाई म्हणून येण्यापेक्षा शाळेत शिपाई कां झाला नाहीस ?'

त्याच्या या गुणामुळे त्याला बढती मिळत नव्हती. तो नेहमी काहीतरी करून दाखवावे अशा ईर्षेने रोज घराबाहेर पडत असे पण त्याला काहीच करून दाखवता येत नसे. रात्री तो अगदी मरगळलेल्या शरीराने व खिन्न मनाने घरी येत असे.









अनुक्रमणिका

त्याची बायको रोज त्याला टोचून बोलत असे, "अहो तुमचे सर्व मित्र जमादार, हवालदार झाले. तुम्ही कधी होणार? का जन्मभर साधे पोलीसच रहाणार ?"

तो म्हणे, "नशिबात असलं तर मीही होईन हवालदार."

"नशीब कशाला पाहिजे ? काहीतरी काम करून दाखवा. नाकावरची माशीही उठत नाही तुमच्या मग तुम्हाला बढती कशी मिळणार ?"

तिच्या या कटकटीने राजाराम चिडला होता. आता विनयभंगासाठी खास पोलीसदल स्थापन झाले होते. त्या दलात आपल्याला घ्यावे अशी विनंती करायला तो कुलकर्णी इन्स्पेक्टरांकडे चालला होता. एकदा त्या दलात भरती झाली की विनयभंगाच्या पाच सहा केसेस तो पकडणार होता. त्याचे नाव होणार होते. त्यामुळे साहजिकच त्याला बढती मिळणार होती.

त्याने कुलकर्णी इन्स्पेक्टरांना सॅल्यूट ठोकला. त्यांनी राजारामकडे बारीक नजरेने पाहिले व म्हटले, " कां आला होतास ?"

तो म्हणाला, "साहेब माझी एक विनंती आहे."

"सांग."

"साहेब, मला विनयभंगाच्या खास पोलीसदलात घ्या."

"तुला ?" कुलकर्णींना फार आश्चर्य वाटले होते. राजारामाच्या कामाबद्दल त्यांना सर्व माहिती होती.

"होय साहेब, मला माझं कार्य दाखवायला अजून संधी मिळाली नाही. तुम्ही या खास दलात मला घेतलेत की संधी मिळेल व मला बढती मिळण्याचा चान्स येईल."

"अरे राजाराम, तुला हे काम जमणार नाही. तू या भानगडीत पडूच नको."

"नको नको साहेब माझ्यावर दया करा. माझ्या प्रगतीचा मार्ग रोखू नका."

राजाराम फार वेळ त्यांच्या विनवण्या करीत राहिला. शेवटी नाईलाजाने कुलकर्णींनी त्याला खास पोलीसदलात सामील केले.

त्या दिवशी राजाराम घरी आला व बायकोला म्हणाला, "घे ! झालं तुझ्या मनासारखं !"

"काय झालं ?"

"बढती मिळाली."

"बढती मिळाली. खरंच ?"

"मिळाली म्हणजे मिळाल्यात जमा आहे. मला खास पोलीसदलात घेतलं आहे. उद्यापासून खास पोलीसदल विनयभंगाच्या केसेस पकडण्याचं काम सुरू करणार आहे. गावात विनयभंगाच्या इतक्या केसेस घडतात की मी सहज पाच सहा केसेस पकडू शकेन."

"हो बाई. दहापाच केसेस पकडाच तुम्ही ! मग बढती काही दूर नाही."

"मग सांगतो काय ? तुला काय वाटलं ?"

बायको त्याच्याकड एकटक नजरेने पाहू लागली तेव्हा राजाराम चक्क लाजला.

**...खाटकाला विकलेल्या शेळीसारखा दीनवाणा होऊन राजाराम पुढं चालत होता . . . मागे त्याची बायको चवताळलेल्या वाघिणीसारखी गुरगुरत चालली होती..**

दुसरे दिवशी सकाळीच राजाराम ड्यूटीवर निघाला. त्याची नेमणूक शहराच्या पश्चिम भागात केली होती. हा भाग नुकताच वाढत होता. गावातल्यासारखी येथे गर्दी व वर्दळ नव्हती. त्यामुळे येथे विनयभंगाचे व स्त्रियांना छेडण्याचे प्रकार बरेच घडत होते. आपली या भागात नेमणूक झाल्याबद्दल राजारामाने देवाचे आभार मानले.

राजाराम ड्रेस सावरीत रस्त्याच्या एका कोपऱ्यावर उभा राहून सगळीकडे बारकाईने नजर ठेवीत होता. रस्त्यावरून लोकांची व वाहनांची जा-ये सुरू झाली होती. तास दोन तास झाले तरी विनयभंगाचा एखादा प्रकारही त्याच्या नजरेस पडला नाही. 'पण विनयभंग म्हणजे काय ?' हा प्रश्न राजाराम मनाशी विचारीत होता. कुलकर्णी साहेबांनी विनयभंग म्हणजे काय हे सांगितले असते तर बरे झाले असते, असे त्याला वाटले. विनयभंग म्हणजे एखाद्या पुरुषाने एखाद्या बाईचा हात धरणे किंवा तिला धक्का मारणे एवढे मात्र त्याला माहीत होते. पण असा प्रकार अजून त्याच्या दृष्टीस पडला नव्हता.

आता राजारामला कंटाळा आला होता. म्हणून समोरच्या हॉटेलात जाऊन त्याने चहा घेतला व एक विडी शिलगावून जरा वेळ ओढीत राहिला. तो हॉटेलच्या बाहेर आला तो लगबगीने एक स्त्री त्याच्या समोरून गेली. तिच्या मागोमाग एक पुरुषही घाईघाईने गेला. राजाराम सावध झाला. नक्की येथे पाणी मुरत आहे. तोही त्यांच्या नकळत हळूहळू त्या दोघांच्या मागे चालू लागला. मधून तो पुरुष त्या स्त्रीशी काही बोलत होता. पण ती स्त्री त्या पुरुषाशी एक शब्दही बोलत नव्हती. तो पुरुष जवळ आला की रस्त्याच्या दुसऱ्या बाजूस जाऊन चालत असे. असे बराच वेळ घडत होते.

नंतर एकाएकी त्या पुरुषाने त्या बाईचा हात धरला व तिला थांबवले. राजारामाने ताडकन् उंच उडी मारली. घडला ! विनयभंग घडला ! तो धावतच त्या दोघांजवळ गेला व त्या पुरुषाला म्हणाला, "मिस्टर काय चालवलंय ?"

पोलीसाला पाहून ते दोघेही चकित झाले होते. तो पुरुष म्हणाला, "कुठं काय ?"

"तुम्ही या बाईचा हात धरला की नाही ?"

"हो."

"मग चला."

"कुठं ?"

"गेटावर."

"कां ?"

"कारण तुम्ही या बाईचा विनयभंग केला आहे."

तेवढ्यात ती बाई 'आई ग ! आई ग !' असं म्हणत समोरच्या घरात धावत गेली व घरातील चार पाच माणसांना घेऊन बाहेर





अनुक्रमणिका

आली. त्यातील एक पोक्त बाई राजारामला म्हणाली, "हवालदार साहेब."

हवालदार म्हटल्याने राजाराम खुलला. तो म्हणाली, "या माणसानं या बाईचा विनयभंग केला आहे."

ती पोक्तबाई म्हणाली, "कसला विनयभंग घेऊन बसलात हवालदार साहेब ! ही माझी मुलगी व हे आमचे जावई बापू ! दोघांचं भांडण झालं आणि ही इकडे माहेरी निघून आली. दोन वर्षं इथंच होती. आज जावईबापू आलेले दिसतात. दोघांची रस्त्यात गाठ झालेली दिसते. ते तिला झालं गेलं विसरून जा असं म्हणाले वाटतं. ते तिला परत घेऊन जायला तयार आहेत. दोन वर्षांनी नवरा बायकोची दिलजमाई होत आहे आणि तुम्ही त्याला विनयभंग म्हणता ?"

राजाराम किंचाळला, "काय हे दोघे नवरा बायको आहेत ?"

"होय. कुणालाही विचारा !"

राजाराम निराशेने व खिन्न मुद्रेने म्हणाला, "मग कसला आला आहे विनयभंग ! मी जातो."

ती बाई म्हणाली, "वा हवालदार साहेब, आम्ही तुम्हांला असं जाऊ देणार नाही. तोंड गोड करून जा. चहा प्यायला चला."

राजाराम नको नको म्हणत होता. ती बाई म्हणाली, "नको कसं ! माझी केवढी मोठी काळजी दूर झाली. दोन वर्षं माझी पोर झुरत होती. आता ती सासरी जाईल. आनंदाचा प्रसंग आहे हा. चला लाडू खा. चहा प्या. अन् जा."

राजारामला नाईलाजाने त्यांच्या घरी जावे लागले. लाडू व चहा गोड असून त्याला कडू लागले.

नंतर जेवणाच्या वेळेपर्यंत त्याला विनयभंगाची एकही केस आढळली नाही. मग तो जेवायला गेला. बायकोने विचारले, "मिळाली का केस ?"

"छे. अजून नाही."

मधाचा प्रकार बायकोला सांगणे योग्य नाही असे त्याला वाटले. तिने त्याची थट्टाच केली असती.

दुपारी आपला गणवेश सावरीत राजाराम घराबाहेर पडला व चोहोकडे बारीक नजरेने पहात चालू लागला.

जरा वेळाने त्याला एक बुटकी, काळी व किडकिडीत स्त्री जाताना दिसली. तिने चष्मा लावला होता. तिच्यामागे तसाच एक काळा व अशक्त तरुण चालला होता. तो शीळ वाजवीत होता. झटकन् राजाराम बाजूला उभा राहिला. आता काही तरी घडणार हे नक्की !

तो तरुण शीळ घालीतच त्या स्त्रीजवळ गेला. व तिला म्हणाला, "अहो थांबा. किती भरभर चालता ?"

ती स्त्री थांबली व म्हणाली "पण तुम्ही कोण ?"

"मी तुमचा चाहता ! किती दिवस मी तुमच्या मागं फिरतोय."

"ते मला माहीत आहे. तुमचं काय काम आहे सांगा."

"आता तेही सांगायला हवं का ?"

"होय."






अनुक्रमणिका

"ओळखा तुम्हीच."

"हे पहा सरळ काय सांगायचं असलं तर सांगा. नाही तर मी जाते."

असे म्हणून ती निघाली. अहो अहो असे म्हणत तो तरुणही तिच्यामागे निघाला; पण ती थांबली नाही. तेव्हा त्याने तिचा पदर धरून ओढला आणि नेमक्या त्याच क्षणी राजारामने त्याचे बकोटे पकडले. व म्हटले,

"का हो मिस्टर, काय चाललंय ?"

पोलीस पहाताच त्या तरुणाची बोबडी वळली. ती तरुणीही घाबरल्यासारखी दिसली.

"तुम्ही या बाईचा पदर ओढला की नाही ?"

"नाही. नाही. म्हणजे हो.

"म्हणजे तुम्ही या बाईचा विनयभंग केला. चला."

"कुठं ?"

"गेटावर."

गेटावर शोभा होणार या कल्पनेने ती तरुणी घाबरली. ती म्हणाली, "माझी काही तक्रार नाही." राजाराम जोरात म्हणाला, "नाही कशी ? या माणसानं तुमचा पदर ओढला. मी समक्ष पाहिलं आहे."

ती म्हणाली, "अहो हा माझा रोज पदर ओढतो. आज आठ दहा दिवस झाले, पदर ओढतो. पदराच्या पुढं याने जावं म्हणून मी रोज देवाची प्रार्थना करीत होते. पण हा काही जात नव्हता."

"म्हणजे हा काय प्रकार आहे ?"

या वेळपर्यंत त्यांच्याभोवती बरीच गर्दी जमली होती. लोक मजेने हा प्रकार पहात होते.

ती तरुणी म्हणाली, "मी प्राध्यापिका आहे. माझ्याशी लग्न करण्यास कोणीच तयार होत नाही. आमच्या कॉलेजातला प्राध्यापक डेमॉन्स्ट्रेटरच काय पण साधा शिपाईही माझ्याकडे ढुंकूनसुद्धा पहात नाही. काय सांगू लोकहो ? माझ्याशी शारीरिक तर जाऊ द्याच, पण बौद्धिक विवाह करायलाही कोणी तयार झालं नाही. हा तरुण तरी माझ्याशी लग्न करायला तयार व्हावा म्हणून मी याला जरा खेळवीत होते, तर या पोलीसाने मध्ये खोडा घातला."

यावर गर्दीतील एक जण म्हणाला, "काही पोलीसदादा, लग्न जमवायचं सोडून तुम्ही मोडायला निघाला ?"

दुसरा म्हणाला, "हे पाप आहे."

तिसरा म्हणाला, "एखादी स्त्री मार्गी लागते आहे हे पहावत नाही का तुम्हाला ?"

गर्दीतले सर्व बोलत राहिले. शेवटी ती तरुणी पदर ओढणाऱ्या तरुणाला म्हणाली, "चला हो. किती दिवस नुसता पदर ओढणार. चला."

असे म्हणून ती तरुणी त्या तरुणाचा हात धरून चालू लागली. जाता जाता तो तरुण गर्दीला म्हणाला, "थँक्स हं. माझंही लग्न जमत नव्हतं. ते तुमच्यामुळे जमलं."

**दोघेही हातात हात घालून आनंदानं निघून गेले.**

राजारामाने कपाळावर जोरात हात मारला.

सर्व दुपार फुकट गेली होती. त्या संध्याकाळी तो कामगिरीचा रिपोर्ट द्यायला कुलकर्णी साहेबांकडे गेला. त्याची हकीकत ऐकून कुलकर्णी म्हणाले, "राजाराम, ड्रेसात तुला अशा केसेस सापडणार नाहीत. उलट तुझा ड्रेस पाहून कोणी गुन्हा करणार नाही. उद्या साध्या ड्रेसात जा. नशिबानं तुला एखादी केस मिळेल."

"होय साहेब."

दुसऱ्या दिवशी राजाराम साध्या ड्रेसात बाहेर पडला. साहेबांचे म्हणणे बरोबर होते पोलीसाच्या ड्रेसाला लोक बिचकणारच. आता तो धोका नव्हता. परंतु राजारामला दुपारपर्यंत एकही विनयभंगी सापडला नाही.

तो दुपारी जेवायला घरी आला, तेव्हा बायको म्हणाली, "काय केस मिळणार आहे की नाही ? चांगले गणपतीचे दिवस आहेत. लोक रात्री आरास बघायला गर्दी करीत आहेत. एवढ्या मोठ्या गर्दीत तुम्हाला एकही केस मिळत नाही ?"

तो म्हणाला, "मी गणपतीच्या गर्दीवर लक्ष ठेवलंच नव्हतं. आज मात्र मी संध्याकाळी ड्यूटी करणार आहे. रात्रीपर्यंत एक तरी केस मिळवीनच."

"हे पहा आज मी शेजारच्या बायकांबरोबर बागेत जाणार आहे. मला यायला जरा उशीर होईल."

"होऊ दे. मी रात्रीच घरी येणार आहे."

राजाराम त्या दिवशी संध्याकाळी साध्या ड्रेसात बाहेर पडला व त्याला नेमून दिलेल्या भागात जेथे जेथे गणपती बसवलेले होते तेथे जाऊन त्याने नजर टाकली. एका गणपतीपुढे फार गर्दी झाली होती.




**"भारताचे घटनाधिष्ठित प्रजासत्ताक"**










अनुक्रमणिका

कारण गणपतीपुढील देखावा फारच सुंदर रीतीने सजविलेला होता. पुरुषांची, बायकांची, मुलांची एकच झिम्मड उडाली होती. ती गर्दी पाहून राजारामला आनंद झाला. या गर्दीत विनयभंग करणारा एखादा तरी मिळणारच !

जरा लांब उभे राहून राजाराम त्या गर्दीवर लक्ष ठेवून उभा होता. स्त्रियांसाठी व पुरुषांसाठी वेगळ्या रांगा केल्या होत्या. तरी दोन्ही रांगा केव्हा एक होत, ते कळत नव्हते. विशेषतः स्त्रियांच्या रांगेत फारच रस्सीखेच चालली होती.

बराच वेळ काही घडेना. नजर ठेवून राजाराम कंटाळला. शेवटी तो हॉटेलात जाऊन चहा पिऊन आला. एक विडी ओढली तेव्हा त्याला बरे वाटले.

आता स्त्रियांच्या रांगेत फारच गर्दी वाढली होती. बंदोबस्त ठेवण्यासाठी काही पोलीस व स्त्री पोलीस ठेवले होते. तरी त्यांना ती गर्दी आवरत नव्हती. राजारामची ड्यूटी विनयभंग शोधण्याची होती. गर्दी आवरण्याची नव्हती. परंतु एके ठिकाणी स्त्रियांची इतकी खेचाखेच चालली होती की ती त्याला पाहवेना. तेथील स्त्री-पोलीसांच्या स्त्रियांना आवरता आवरता नाकी नऊ येत होते.

स्त्री पोलीसांचे हाल व स्त्रियांची खेचाखेच पाहून राजारामला इतका संताप आला की तो रागारागाने त्या स्त्रियांच्या रांगेजवळ गेला व जास्त ढकलाढकली करणाऱ्या एका स्त्रीच्या हाताला धरून त्याने तिला ओढून बाहेर काढले व म्हटले, "काय बाई, एवढी ढकलाढकली कशाला करता ? बाकीच्यांना त्रास होतो ना !"

एका पुरुषाने हात धरलेला पाहून ती स्त्री आधी जोराने किंचाळली व मग राजारामकडे पाहून म्हणाली, "अय्या, भाऊजी तुम्ही ! तुम्ही पण गणपती पहायला आला ! कित्ती मज्जा !"

पण तिच्या मारलेल्या किंचाळीने त्या दोघांभोवती गर्दीचे एकच कडे झाले. त्यात राजारामची बायकोही होती. ती कमरेवर हात ठेवून पुढे आली व म्हणाली, "का हो तुम्हाला विनयभंग शोधायला पाठवलं की करायला ?"

तो चाचरत म्हणाला, "मी विनयभंग कुठं केला ?" गर्दीतले बरेच जण ओरडले, "यानं या बाईचा विनयभंग केला. बाई मोठ्यानं किंचाळली होती. सर्वांनी तिची किंकाळी ऐकली आहे."

राजारामची बायको म्हणाली, "का हो, तरीच तुम्ही हिला वैनी, वैनी म्हणत सारखं त्यांच्या घरी जात होता ! कां जात होता हे मला आतापर्यंत कळलं नव्हतं. पण आता चांगलं कळलं."

त्यावर ती बाई चपापली. ती दुसरी तिसरी कोणी नसून राजारामच्या क्वॉर्टरमध्येच शेजारी राहणाऱ्या तुकाराम पोलिसाची बायको होती. राजाराम कधी तुकारामच्या घरी जात असे. तेव्हा तिला कधी कधी वैनी म्हणत असे. पण त्याचा अर्थ त्याच्या बायकोने भलता घेऊन एवढ्या गर्दी समक्ष त्याचा पाणउतारा केला होता. परिस्थितीचे गांभीर्य राजारामच्या लक्षात आले होते.

तो बायकोला म्हणाला, "हे पहा, मी मुद्दाम नाही वैनींचा हात धरला."

बायको त्याच्याभोवती हात ओवाळून म्हणाली, "मग कां धरला ?"

"येथे गर्दी झाली होती म्हणून धरला. पण तू इथं कशी ? तुम्ही बागेत गेला होता ना ?"

"हो बाग पहात घरी जाता जाता काही गणपती पाहून जाऊ म्हणून येथे आलो पण हे पहायला मिळेल असं नव्हतं वाटलं." असं म्हणून ती डोळ्याला पदर लावून रडू लागली.

एक माणूस राजारामला म्हणाला, "या बाई तुमच्या कोण ?"

"माझी बायको."

"अन् जिचा हात तुम्ही धरला त्या कोण ?"

"त्या आमच्या शेजारी रहातात."

त्यावर तो मनुष्य अर्थपूर्णपणे म्हणाला, "अस्सं !"

एवढ्यात गर्दीवर लक्ष ठेवणारा एक पोलीस तेथे आला. तो राजारामला ओळखत होता. तो राजारामला म्हणाला, "काय भानगड आहे रे ? अन् तुझा ड्रेस काय झाला ? ड्यूटीवर नाहीस काय ?"

त्यावर गर्दीतला दुसरा माणूस म्हणाला, "म्हणजे हे पोलीस आहेत काय ?"

"होय."

एक स्त्री म्हणाली, "म्हणजे चांगले पोलीस असून एका स्त्रीचा हात धरता ?"

राजाराम म्हणाला "मी चांगलाच पोलीस आहे. वाईट नाही काही. वाटल्यास या पोलीसाला विचारा."

गर्दीतला आणखी एक माणूस त्या पोलीसाला म्हणाला, "अहो या माणसानं या बाईचा हात धरून विनयभंग केला आहे. त्यांना तुम्ही गेटावर घेऊन जा. साक्ष द्यायला आम्ही येतो."

त्या पोलीसाच्या लक्षात सारी परिस्थिती आली. तो म्हणाला, "यानी विनयभंग केला नाही. या बाई यांच्या शेजारीच रहातात. चुकून ही गोष्ट घडली आहे. हा सारा गैरसमजाचा प्रकार आहे." मग त्याने राजारामला व त्याच्या बायकोला बाहेर काढले. त्यांची शेजारीण राजारामच्या बायकोला म्हणाली, "तुम्ही घरी जा. आम्ही आणखी काही गणपती पाहून येतो."

तो पोलीस राजारामला म्हणाला, "तू आता येथे थांबू नकोस. घरी जा. नाही तर दुसऱ्या गणपतीपुढे उभा रहा. तरी कुलकर्णी साहेबांनी तुला सांगितलं होतं की हे काम तुला जमणार नाही. मीही तुला तसंच सांगितलं होतं.पण तू हट्टानं हे काम मागून घेतलंस."

राजाराम खिन्न मुद्रेनं म्हणाला, "माझी चूक झाली. मला काय माहीत असं होईल ते !"

राजारामची बायको अजून रागातच होती. ती त्याला म्हणाली, "आता मुकाट्यानं घरी चला. आणि उद्याच्या उद्या खास पोलीस-दलातूनच तुमचं नाव काढून घ्या. आपल्याला बढती बिढती काही नको. आपलं ठीक चाललंय. काही वाईट नाही. मग काढणार ना उद्या नाव त्या दलातून."

राजाराम खाली मान घालून म्हणाला, "होय."

"हं आता चला घरी. व्हा पुढं."

खाटकाला विकलेल्या शेळीसारखा दीनवाणा होऊन राजाराम पुढं चालत होता. मागे त्याची बायको चवताळलेल्या वाघिणीसारखी गुरगुरत चालत होती.

•••



# गांधीजींचे व्यसनमुक्त समाजाचे स्वप्न साकार करू या

प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई

अनुक्रमणिका











[ जीवनाच्या सर्वच क्षेत्रांमध्ये आज प्रस्थापितांविरुद्ध ओरड सुरू आहे आणि बंडखोरांना संधी मिळावी म्हणन 'प्रस्थापितां'नी आता निवृत्त झाले पाहिजे अशी बंडखोरांची जोरदार मागणी आहे. या प्रकरणी दोन्ही बाजूंचे म्हणणे समजून देण्या-घेण्याच्या दृष्टीने हा नवा परिसंवाद आम्ही या महिन्यापासून सुरू करीत आहोत. राजकारण सोडून साहित्य, समाजजीवन, कला, शिक्षण इत्यादि क्षेत्रांतील नामवंत व्यक्तींनी या परिसंवादात भाग घेऊन आपापले विचार वाचकांपुढे मांडावेत असे आम्ही विचारवंताना आवाहन केले आहे. त्यांच्याकडून येणारे साहित्य 'दीपावली'त क्रमशः येणारच आहे. वाचकांपैकीही कोणाला आपले या विषयावरील विचार व्यक्त करावयाचे असतील तर ते त्यांनी सुमारे १००० ते १२०० शब्द संख्येच्या मर्यादेत अवश्य पाठवावे. प्रसिद्धीयोग्य वाटल्यास या परिसंवादात त्यांचा समावेश करण्यात येईल. या अंकात डॉ. अनिल अवचट आणि श्री. श्रीकान्त सिनकर यांचे लेख प्रसिद्ध होत आहेत —संपादक ]

—डॉ. अनिल अवचट

प्रस्थापिताविरुद्ध बंडखोरी म्हटले की आपल्या इकडे सर्वसाधारण असा समज आहे की मंडळींना चांगले चाललेले नको असते, यांना अराजक माजवायचे आहे; हे आमच्या जीवनमूल्यांवर प्रहार करीत आहेत आणि आमच्या जीवनात भणंगपणा आणीत आहेत. डोक्यात राख घालून काही तरी बडबडणाऱ्या, प्रसिद्धीस लालचावलेल्या या पिसाट तरुणांना कसे आवरावे अशी लोक चिंता करीत असतात. असा समज प्रस्थापित व्यवस्थेने हेतुतःच करून दिलेला असतो. म्हणून प्रस्थापित विरुद्धचा लढा म्हणजे नेमका काय अर्थ आहे हे सांगणे आवश्यक आहे.

मानवी जीवन हे काही विशिष्ट नैतिक मूल्यांवर आधारित असते. नैतिकतेचा आधार नसेल तर ते मानवी जीवन राहूच शकत नाही हे आपणं मान्य केले तर पुढे आपल्याला असे दिसेल की जसजसा मानवी जीवनाचा काळ जाऊ लागला व जसजशी परिस्थिती बदलू लागली तसतसा मूल्यांमध्येही फेरफार होऊ लागला, काही मूल्ये मानवी जीवनाच्या प्रगतीच्या आड येऊ लागली, ती फेकून द्यावी लागली व मानवी जीवनाच्या प्रगतीचे स्रोत पुढे वाहू लागले. हा प्रकार मानवी जीवनाच्या इतिहासात कायम होत गेला आहे. आणि म्हणूनच मानवी जीवनाची उंचीही वाढत गेली आहे.

कोठलेही प्रस्थापित मूल्य ज्या वेळेस मानवी प्रगतीच्या आड येते, मानवी जीवनास भारभूत होऊ लागते, जेव्हा त्याची ऐतिहासिक आवश्यकता संपते तेव्हा ते मूल्य फेकून देण्यासाठी समाजधुरीणांना, विचारवंतांना व कृतीवंतांना जो झगडा करावा लागतो तोच हा "प्रस्थापिताविरुद्ध बंडखोरी वा लढा' म्हणून ओळखला जातो.

ही मूल्ये काय आहेत, ती कधी उपयुक्त असतात, भारभूत कधी होतात हे बघणे आवश्यक आहे. पूर्वी अमुक मूल्ये होती ती नष्ट करून अमुक आणायची आहेत असे म्हणणे खरे नाही. मूल्ये तीच असतात. ती त्रिकालाबाधित सत्य असतात. त्याचा व्यवहारातील आविष्कार बदलत असतो. कोठलेही मूल्य निराकार स्वरूपात वावरू शकत नाही. त्याला संघटनात्मक जोड व संदर्भ आवश्यक असतो. हे जसे खरे तसे ज्या वेळेस त्याला ही संघटनात्मक जोड मिळते, त्यानंतर लवकरच त्याच्या अपकर्षासही सुरुवात होते व तेव्हा ती मूल्ये समाजास भारभूत झालेली असतात त्या वेळेस त्या मूल्याचा संघटनात्मक आविष्कार मोडून काढणे ही वर्तमान काळाची एक गरज होऊन बसते.

## गतिशील जीवनातील गरज

बंडाच्या प्रक्रियेतून सारीच दैवते फुटतील व नवी दैवते उभी राहिली नाहीत तर एकादी भयाण पोकळी निर्माण होईल अशी ज्यांना भीती वाटते त्यांनी मूल्य प्रस्थापनाची प्रक्रिया पुन्हा एकवार समजावून घ्यावी. मूल्य प्रथम कोणीतरी एखाद्या पुस्तकात लिहिले आणि त्याप्रमाणे ते समाजात प्रस्थापित केले, किंवा इतिहासातून एखादे गणित बसवून पुढील समाजाच्या भविष्याचे आडाखे मांडले व त्यानुसार योजना तयार केली आणि ती समाजाला लागू केली असे कधीही घडत नाही. काळानुसार समाज बदलत असतो कारण तो गतिशील आहे व समाजात जे बदल घडले, जे नवे हितसंबंध निर्माण झाले त्यातून नवी मूल्ये जन्म घेत असतात. ती त्या वर्तमानकाळाच्या आवश्यकतेनुसार असतात. म्हणून जो भारभूत झालेल्या मूल्यावर आघात करीत असेल त्याला तुझी नवी मूल्ये दाखव असे विचारण्यात अर्थ नाही किंवा अनैतिक म्हणून खिजवण्यातही पुरुषार्थ नाही.

उलट ज्या लोकांनी धार्मिक कल्पनांवर आघात केले ती माणसे अत्यंत नीतीमान व एका अर्थाने अत्यंत धार्मिक वृत्तीची माणसे म्हटली पाहिजे. त्यांच्या कार्यामुळेच समाज प्रगत व उच्च

अवस्थेला जातो हे समजावून घेऊन त्यांचे ऋणही मानले पाहिजे. तसेच जी माणसे 'आम्हांला भविष्याचे ज्ञान झाले आहे व त्यानुसार आम्ही समाजनिर्मिती करणार आहोत हा पहा आमचा ब्ल्यूप्रिंट' असे म्हणतात ती माणसे अंध बनून स्वतःची फसवणूक करीत आहेत असे म्हटले पाहिजे.

कारण काळाच्या ओघाने घडणाऱ्या बदलाचे भविष्य कोणी वर्तवू शकणार नाही. त्यावर इलाज एकच आहे की इतिहासाचे आकलन करून घेणे, वर्तमानकाळावर जागृत नजर ठेवणे, भविष्यकाळात स्वतःस झोकून देणे,त्या त्या वेळेस जी व्यवस्था समाजहिताच्या दृष्टीने बाधक वाटेल तिच्यावर हल्ला करून वर्तमानकाळाच्या दृष्टीने योग्य अशा मूल्यांवर आधारित अशी व्यवस्था निर्माण करण्याचा प्रयत्न करणे, हेच कर्तव्य राहते. ही आकलन शक्ती केवळ वैयक्तिक असेल. कदाचित त्याची ती कृती समाजविरोधी होती असे भविष्यकाळाने ठरविले तरी तो म्हणेल, ठीक आहे, माझे भविष्यकाळाचे गणित चुकले होते.

मार्क्सने जे लिहून ठेवले ते लेनिनने जरी स्वीकारले, तरी त्याने त्यावेळेनुसार मार्क्सिस्ट तत्त्वज्ञानाला आपले वेगळे स्वरूप दिले होते. मार्क्सने सांगितले होते की जास्त औद्योगिकरण झालेल्या देशात (उदा. जर्मनीत) प्रथम क्रांती होईल पण लेनिनने ती क्रांती रशियासारख्या अर्ध-औद्योगिकरण झालेल्या देशात घडविली व माओने तर शेतीप्रधान अशा चीनमध्ये घडवून आणली. त्यांच्याकडे असे कोणतेही 'ब्ल्यू प्रिंट्स' नव्हते. परिस्थितीच्या आकलनावर व त्या त्यावेळच्या आडाख्यांवर त्यांचे कार्यक्रम आधारित होते.

आपल्या देशात पहायला गेले तर आपल्याकडे इंग्रज आले, पाश्चात्य संस्कृती आली. लोकांना आपल्या धर्मातील, चालीरीतीतील दोष दिसू लागले. राममोहन रॉय, लोकहितवादी, रानडे यांची पिढी निर्माण झाली. त्यांनी समाजसुधारणेसाठी समाजातील अंध श्रद्धांवर आघात चढविले. त्या आघातांची अत्यंत आवश्यकता व उपयुक्तताही होती. पण त्याचे सूत्र 'इंग्रजी सत्ता हे ईश्वरी वरदान आहे' या विचाराशी जोडलेले होते. त्यामुळे टिळकांनी त्याविरुद्ध भूमिका घेतली. आधीच्या लोकांनी सुराज्य निर्माण करण्यासाठी उपयुक्त प्रयत्न केले असले तरी त्याचा उपयोग प्रस्थापित इंग्रज सत्ता स्थिर होण्यासाठी झाला. या उलट टिळकांनी स्वराज्य हवे म्हणून प्रस्थापितावरोबर लढा आरंभिला. आधीची सुराज्यवाली पिढी सुद्धा क्रांतिकारक होती. पण समाजजीवनात स्वराज्याची आवश्यकता निर्माण झाल्यावर ती मंडळी मागे पडली. टिळकांनाही सुराज्य हवे होते. पण त्या आधी स्वराज्य हवे होते. हाच मूल्यांचा झगडा होय.

## समाजाच्या प्रगतीसाठी

असा झगडा समान धारणेसाठी, समाजाच्या प्रगतीसाठी आवश्यक असतो. याला आपण विध्वंसक, काही तरी अराजक माजविणारा झगडा मानणे चूक आहे. काहीतरी समाजाचे नैतिक असे अधःपतन चालले आहे असे समजू नये. आगरकरांच्या वेळेस बायका पायात चपला घालीत नसत. त्या घालू लागल्या तेव्हा केवढे नैतिक अधःपतन चालू आहे अशी ओरड करण्यात आली. आज सगळीकडे बायका चपला घालतात. त्यांचे अधःपतन झाले असे आपण मानीत नाही. समाजाच्या नैतिक कल्पना बदलत असतात. पेहराव, वागणे, शिष्टाचार यात सारखे बदल चालू असतात. म्हणून मानवी जीवन नित्यनूतन व टवटवीत रहात आले आहे. जे जुन्या कल्पनांना धरून राहतात त्यांच्या दृष्टीने बदललेला समाज हा बिघडलेला असतो. हा दृष्टीकोनातला फरक आहे. आमची पिढी जास्त नीतीमान होती, तुमची नाही अशी फुशारकी कोणी मारू नये.

## अजून नीत्सेचेच अनुयायी

आपल्या समाजात जी संपत्ती आहे तिची मालकी वैयक्तिक आहे की ती सर्व समाजाच्या मालकीची आहे हा प्रत्येकापुढे प्रश्न उभा राहतो. भले भले बंडखोर म्हणविणारे येथे कणखर भूमिका घेऊ शकत नाहीत. बिहार उत्तर प्रदेशात व इतरत्रसुद्धा जमीनदारी पद्धत आहे. एकेका जमीनदाराच्या दहा हजार, वीस हजार एकर अशा जमिनी आहेत. तेथील लोकांना "कसेल त्याची जमीन" हे मूल्य खरेसुद्धा वाटत नाही; पण आपल्या महाराष्ट्रात ते अमलात सुद्धा आले आहे. तसेच आपल्या इकडे कामगारांचे पगार, त्यांच्या नोकऱ्या, त्यांचे जीवनमान हे सर्व कारखानदारांच्या वैयक्तिक इच्छेवर अवलंबून असते हे आपण मान्य करून टाकले आहे. मालाचा भाव त्याने ठरवायचा, तो भाव त्याला पाहिजे तसा वाढवून दिला नाही तर त्याच्या इच्छेनुसार तो कारखाना बंद करू शकतो, हजारो कामगारांना बेकार करू शकतो यात आपल्याला काही विध्वंसक वाटत नाही. मजुरांच्या हक्कासाठी त्यांनी कारखाना एकादा दिवस बंद ठेवला तर देशाच्या उत्पादनाचा विध्वंस होतो म्हणून चिंता करणारी विचारवंत मंडळी, कारखानदार त्यांच्या सोयीसाठी जेव्हा कारखाने बंद पडतात तेव्हा काही तक्रार करीत नाहीत. कारण आपल्यामध्ये अजून संपत्ती समाजाच्या मालकीची असते व समाज हा बहुसंख्यांचा असतो हे मूल्य रुजलेच नाही. अजून आम्ही मनातून नीत्सेचेच मूल्य मानीत आहोत की हे राज्य हे शक्तीमंतांचे राज्य आहे. जे शक्तीशाली नाहीत, जे कमजोर आहेत त्यांनी शक्तीमंतांची सेवा करावी.

जो अन्यायाविरुद्ध लढतो त्याला आमच्या समाजात तिरस्कारच वाटायला येतो. हे विचारवंत म्हणतात की तुमची भूमिका ही नाकारात्मक आहे. तुमच्याकडे 'पॉझिटिव्ह' काय आहे ? असे विचारून हे विचारवंत त्याला हिणवत असतात. अन्यायाचा प्रतिकार करणाराला पॉझिटिव्ह काय हवे असते ? त्याला अन्यायाचा निःपात करायचा असतो. अन्याय नष्ट झाल्यावर आपोआप न्याय प्रस्थापित होतच असतो. न्यायाची वेगळी अशी काय प्रस्थापना करायची असते ? • एकाद्या माणसास समजा टी. बी. झाला आहे








त्याच्यावर इलाज़ करणाराला असे का आपण विचारू की तू टी. बी. घालविणार आहेस त्याजागी 'पॉझिटिव्ह' काय आणणार आहेस ? काय आणणार म्हणजे ? काही नाही. टी. बी. शरीराचा नाश करीत आहे. त्याचा नाश करणे हे मी कर्तव्य समजतो. पण आरोप करणारे केवळ अज्ञानाने करीत असतात असे नव्हे ! बऱ्याच वेळा ते हेतूतः केले जातात. प्रस्थापित व्यवस्थेत ज्यांचे हितसंबंध गुंतलेले आहेत ती माणसे, ती सरकारे अशा विचारांना अगत्याने उत्तेजन देत असतात.

गांधींची जन्मशताब्दी चालू आहे, धूमधडाक्याने साजरी होत आहे. त्यात समाजाची पिळवणूक करणारी मंडळी अग्रभागी दिसतात. पण प्रत्यक्ष व्यवहारात गांधींच्या जीवनातील 'अन्यायाचा प्रतिकार' या सर्वात महत्त्वपूर्ण असलेल्या सूत्राचे जे पालन करीत आहेत त्यांना हीच मंडळी पायदळी तुडवीत असतात. हा विरोधाभास कोणी उघडचावर कां आणीत नाही ?

स्वतःला बंडखोर म्हणविण्याऱ्या तरुणांच्या आचारविचारांना काही तात्त्विक अधिष्ठान आहे काय ? कां केवळ आपल्याला काही स्थान प्राप्त करून घेण्यासाठी ही धडपड आहे ? असा प्रश्न नेहेमी विचारण्यात येतो. यातील उत्तरार्ध प्रथम घेऊ. आपल्याकडे काम करणाऱ्या माणसाची नालस्ती करण्यासाठी 'तुला खऱ्या अर्थाने काम करायचे नाही. पुढारीपण मिळविण्यासाठी धडपड चालू आहे' असे म्हटले जाते.

## समाजहिताच्या तळमळीपायी

प्रथम सांगितले पाहिजे की समाजामध्ये समान हिताच्या तळमळीपायी सर्व वैयक्तिक जीवन विसरून गेलेली काही मंडळी होऊन जातात. ती अत्यंत महान् अशी आहेत. पण ती विरळा असतात. दुसऱ्या प्रकारची माणसे असतात जे समाजहितासाठी धडपडत असतात व त्याचबरोबर त्यांचा वैयक्तिक स्वार्थही काम करीत असतो. पण ज्यावेळेस त्या दोहोंमध्ये झगडा निर्माण होईल त्यावेळेस ते समाजहितास जास्त महत्त्व देतात व वैयक्तिक स्वार्थास बाजूला ठेवतात. आणि तिसऱ्या प्रकारचे लोक म्हणजे वैयक्तिक स्वार्थापायी समाजकारणात पडतात. पण त्यांचा विचार करण्याचे कारणच नाही कारण ते बंडखोरच नव्हेत. त्यांना आपण संधिसाधू म्हणू !

दुसऱ्या प्रकारच्या बंडखोरांना, जेव्हा 'तुम्हाला पुढारीगिरी करायची आहे' असे प्रस्थापिताच्यां संरक्षकांकडून म्हटले जाते तेव्हा त्यातील तसे म्हणण्यामागचा स्वार्थ स्पष्ट असतो. लेनिनला सत्ताकांक्षा होती. चर्चिलनेही सत्तेसाठी हरप्रयत्न केले तरी त्यांची ऐतिहासिक कामगिरी काही कमी होत नाही. नेहरू लोकसभेला उभे राहिले म्हणजे त्यात त्यांचा वैयक्तिक स्वार्थ आहे तसेच, ते राष्ट्रकार्यसुद्धा आहे. उद्या आपण सैन्यातल्या एखाद्या सैनिकास म्हटले की तू हे काम तुझे पोट भरण्यासाठी करतो आहेस. हे म्हणणे जसे खरे आहे तसेच युद्धाच्या वेळेस देशासाठी प्राण धोक्यात घालून युद्ध जिंकण्याचे तो राष्ट्रकार्य करतो हेही खरेच आहे. म्हणून समाजात बदल घडवू इच्छिणाऱ्या बंडखोरामध्ये सत्ताकांक्षा असली तरी इतिहास त्याने केलेल्या सामाजिक बदलांचीच नोंद करीत असतो. त्याने त्याचे कार्य हिणकस ठरत नाही.

प्रश्नाच्या पूर्वार्धात उल्लेख केलेल्या बंडखोर तरुणाच्या मागे सध्या चालू असलेल्या आंदोलनांचा संदर्भ असावा असे वाटते. जे असंतुष्ट तरुण आज आंदोलन घडवीत आहेत, त्यांना वचारिक समज आहे का ? त्यांचे आचारविचार खऱ्या अर्थाने बंडखोर आहेत का असे विचारायचे आहे. सध्याच्या आंदोलनामागे विचार नसेल, पण असंतोष तर जरूर आहे ! आणि असंतोप हा कधी कारणाशिवाय नसतो हे उघडच आहे. फुकट कोणी पोलिसांच्या लाठ्या व गोळ्या खायला रस्त्यावर येत नाही. ज्यांच्यामध्ये असंतोप आहे त्यांच्यामध्ये त्याची कारणे हुडकून त्यासाठी मूलभूत स्वरूपाचे आंदोलन करण्याचे कर्तृत्व नसले तर ते दुर्दैव मानले पाहिजे. पण त्याचबरोबर ही चिंता करणाऱ्यांवर जबाबदारी येऊन पडते ते की नेतृत्व, ती भूमिका त्यांना पुरविणे ही होय. त्यांच्या असंतोषास योग्य स्वरुप मिळाले नाही तर ते तसेच भडकत राहील. त्याला कोणाचाच इलाज राहाणार नाही. त्यात असंतुष्ट असणारांचा दोष नाही. दोष, ज्यांना हे सर्व कळत असून, पात्रता असून जे बाजूला राहतात त्यांचा अधिक आहे.

## नक्षलवादी कसे निर्माण होतात ?

ह्या चळवळी, किंवा बंडखोरांकडून झालेले वैचारिक आघात याजमुळे सर्वज़ण गांगरून गेले आहेत. याचे मुख्य कारण यांनी प्रस्थापित व्यवस्थेला धोका आणला आहे हे आहे. एरवी अन्यायाची वा विध्वंसनाची आम्हांला फारशी चाड नाही. परवा बिहारमधील पूर्णिया जिल्ह्यात गेलो होतो. त्याला लागूनच असलेल्या नक्षलवादीच्या हकीगतीही ऐकल्या. तेथली जमीनदारी, तेथले जूलम इकडे सांगितले तर खरे वाटत नाहीत. नको असलेल्या माणसांव खोटे दरोडेखोरीचे खटले भरून ६।६ वर्षे तुरुंगात पाठविणे, विषप्रयोग करणे, बंदुक झाडून मारून टाकणे असले असंख्य प्रकार या १९६९ सालात घडत आहेत. पण त्यामुळे आम्हाला समाजात काही विपरीत चालले आहे असे वाटत नाही. पण एकाद्या जमीनदाराच्या अत्याचारास प्रतिकार झाला की आमच्या विचारवंतांची झोप उडते. जमीनदारास तीर मारू नका असा कुळांना उपदेश करण्याचा या मंडळींना नैतिक अधिकार तरी पोहोचतो का ? ज्यांनी जमीनदारीत असलेल्या अत्याचाराच्या बाबतीत अलिप्तता स्वीकारून अप्रत्यक्षपणे त्यास मान्यता दिली ह्यांना आम्ही समाजहितेच्छु म्हणावे का ? जो अन्यायाचा प्रतिकार करीत आहे तोच लोकांना सांगू शकतो की विध्वंस करू नका, त्याने त्यातून आपण फार थोडे साधू शकू.

आता आपण प्रथम ज्याची चर्चा केली त्याकडे वळू. एखादे मूल्य जेव्हा समाजास भारभूत होते तेव्हा त्यास जमीनदोस्त करण्याची






जबाबदारी बंडखोरांवर येऊन पडते हे आपण पाहिले. ह्या मूल्यांचा नाश दोन प्रकारची मंडळी करीत असतात. एक म्हणजे या समाजातर्ली स्वार्थी मंडळी. एखाद्या काळात एखादे मूल्य रुजले गेले की ते संघटनेच्या माध्यमातूनच रुजले जाते. त्या संघटनेत हे लोक शिरून तोंडाने त्या तत्त्वाचा उदोउदो करून प्रत्यक्ष व्यवहारात त्याच्या नेमके विरुद्ध वागून त्या मूल्याचा नाश करीत असतात. अशा प्रकारे मूल्याचा झालेला भ्रष्ट आविष्कार त्या मूल्याचा व पर्यायाने समाजहिताचा नाश करीत असतो. दुसऱ्या प्रकारची मंडळी म्हणजे या भ्रष्टाचाराने अस्वस्थ झालेले बंडखोर होत. हे विचारपूर्वक व जाणीवपूर्वक हल्ले करीत असतात. त्यांच्या उक्ती व कृतीमध्ये अंतर नसते.

अशा प्रकारे एक मूल्य प्रस्थापित करायचे व ते विकृत झाले की त्याचा नाश करायचा हा क्रम अखंड चालू असतो. कोणी म्हणेल की मग ते मूल्य बदलाच कशाला ? तुम्ही आणणार ते मूल्य सुद्धा काही काळाने असेच होणार आहे ना ?

या प्रश्नाला उत्तर सरळ आहे. हे असे होणार आहे हे आम्हाला माहीत असूनही आपण समाजाच्या प्रगतीच्या दृष्टीने ते करायला पाहिजे. त्यात समाज वरच्या पातळीवर जात असतो. समता हे मूल्य घेऊन अगदी कम्युनिस्ट राज्य आणले म्हणजे काही 'आता समता आली. आता आपण स्वस्थ बसू या' असे म्हणून भागत नाही. माओने रेडगार्ड चळवळीद्वारे देशामधल्या राज्यकर्त्या पक्षाला व नोकरशाहीला आलेले समाजविरोधी मांद्य झटकून टाकले. त्यामागचे कारण हेच आहे. केवळ लिओशाओचिला मारून टाकून प्रश्न सुटणार नव्हता. समाजातली अखंड क्रांतीशीलता कशी टिकून राहणार हा प्रश्न होता. ते केवळ कम्युनिस्ट आहेत किंवा ते आपले आक्रमक शत्रू आहेत म्हणून त्यांनी केलेल्या त्यांच्या देशातल्या कृतीचे किंवा चळवळीचे मोल कमी होत नाही. पोथीनिष्ठा की प्रत्यक्ष अनुभवावर आधारित अशी कृती या संदर्भात हे उदाहरण आहे.

आपली समाजव्यवस्था ही जाती व्यवस्थेवर आधारित आहे. राजकारणाची ती तरफ बनलेली आहे. तिच्याविरुद्ध प्रत्येक जण बोलत असतो व कृतीत मात्र त्याच्या विरुद्ध करीत असतो. आपली अर्थव्यवस्था ही अर्ध औद्योगिक, अर्ध जमीनदारी (Feudal) आहे. संपत्तीच्या व जमीनींच्या या मक्तेदारांना हात लावण्याची कोणाची छाती नाही. पण प्रत्येकाच्या तोंडी समतेचे नारे मात्र अहमहमिकेने चालू आहेत. इंग्रजांचे गुलाम राहणार नाही म्हणून प्राण दिले; पण हरिजनांवर, आदिवासींवर व स्त्रियांवर आम्ही गुलामी गाजवीतच राहिलो.

या दृष्टीकोनांचे आम्ही गुलाम झालो आहोत. राजस्थानच्या सहारात पाण्यावाचून तडफडणाऱ्या माणसांना देण्यासाठी पाणी नाही, पण पलीकडे गुजरातेत चाललेल्या कोटिचंडीच्या ज्वालात ओतण्यासाठी आमच्याकडे हजारो मण तूप आहे. कारखान्याला वेढलेल्या खुराडयात संडास नाहीत, पाण्याचे नळ नाहीत पण एखाद्या महाराजाच्या पुढे ओतायला इस्टेटी आहेत. गरीबांच्या शाळा, आदिवासींची वसतिगृहे बंद पडून गेली पण विष्णु मंदिरे वाढताहेत. उद्योगपतींच्या औदार्याची तोंडभरून, मासिकेभरून स्तुती होत आहे, पण त्यांच्या कारखान्यातल्या मजुरांना गरजेप्रमाणे वेतन मात्र मिळत नाही.

अशी ही प्रस्थापित व्यवस्था बदलल्याशिवाय देश पुढे जाणार नाही हे उघड आहे. बंडखोरांना दूषणे देऊन काय साधणार आहे ? व्यवस्था बदलाशिवाय सर्व सामान्यांची स्थिती बदलत नाही. पाणपोया घालून काही पाणी पुरवठ्याचा प्रश्न सुटत नाही की गांधी जयंतीला झाडू हाती घेऊन गलिच्छ वस्त्या नष्ट होत नाहीत.

• • •



अनुक्रमणिका











# आजचे (सं)तप्त साहित्यिक

—श्रीकांत सिनकर

"संतप्त" या शब्दाचा अर्थ जितका स्पष्ट आहे, तितका "साहित्यिक" शब्दाचा अर्थ स्पष्ट झालेला नाही. साहित्यिक कुणाला म्हणायचे ? ज्याच्या खाती पाच पन्नास पुस्तकं जमा झाली आहेत, जो सातत्याने वाङ्मयातील एखादा प्रकार हाताळीत आहे, तो साहित्यिक, का एखाद्याच्या सात आठ कविता आणि दोन तीन टीकात्मक लेख प्रसिद्ध झाले आहेत, तो साहित्यिक ? का जो "साहित्यिक गप्पा"त भाग घेतो, तो साहित्यिक ? उत्तर मिळणं कठीण आहे; पण या लेखाच्या संदर्भात तरी जो लिहितो तो साहित्यिक एवढ्या-वरच समाधान मानणं, निदान मला तरी भाग आहे. म्हणजेच या "संतप्तां"ना मी या लेखापुरता तरी "साहित्यिक" मानायला तयार झालो आहे.

आपण काय आणि कां लिहायचं, काय आणि कसं छापायचं, हा ज्याचा त्याचा स्वतंत्र प्रश्न आहे. नवं वाङ्मय नव्या पद्धतीने छापून आज "अनियतकालिकां"ची मंदावलेली लाट नव्या वेगाने, नव्या विचाराने पुढे पुढे येत आहे—ठीक आहे. ही काही फारशी वाईट घटना नाही, पण या अनियतकालिकांचे कवी, लेखक, सूत्रधार, संपादक जेव्हा "आम्ही संतप्त आहोत" असा दावा करतात, तेव्हा मोठा अचंबा वाटतो. "संतप्तां"बद्दल या तथाकथित संतप्तांनी काय कल्पना करुन घेतल्या आहेत, त्या मला अजून नीटशा समजलेल्या नाहीत. यांचा संताप केवळ वाङ्मयापुरताच आणि वाङ्मयीन व्यक्तींपुरताच मर्यादित आहे, हे पाहून ही मंडळी "संतप्त" नसून नंबर एकची 'फ्याड' आहेत आणि येन केन प्रकारे आपलं अस्तित्व लोकांना जाणवून देण्याच्या खटपटीत आहेत, असा निष्कर्ष निदान मी तरी काढतो.

मराठी वाङ्मयातील वशिलेबाजी, वाङ्मयातील प्रस्थापित-पणा, मराठी नियतकालिकांवर चीड, आदि संतप्तांचे मुद्दे मी समजू शकतो. पण या संतापामागे संतप्तांची स्वतःची खास अशी कोणती तात्त्विक बैठक आहे ? अमुक एका घटनेचा यांना संताप यावा, त्याचा तो हक्कच आहे, अशी कोणती भरीव कामगिरी या संतप्तांनी पार पाडली आहे ? वस्तुतः प्रत्येकाचेच मार्ग भिन्न भिन्न असतात, जो तो स्वतःच्या मार्गाचा प्रवासी असतो, असं असताना या संतप्तांनी प्रस्थापितांवर कां राग धरावा ? ज्या प्रस्थापितांवर यांचा राग आहे, त्या प्रस्थापितांची पुस्तकं वाचायची, त्यावर बरं किंवा वाईट, काहीतरी लिहायचं, विद्यापीठात प्रस्थापित प्राध्यापक (ज्यांचा वाङ्मयाबरोबर संबंध आहे) जे काही शिकवतील, ते मुकाट्याने शिकायचं, प्रस्थापित मासिकांतून स्वतःच्या अनियतकालिकांची जाहिरात करायची. प्रस्थापितांच्या "साहित्यिक गप्पा"त भाग घ्यायचा, प्रस्थापितांच्या परिसंवादात बोलायचं, हा काय प्रस्थापितां-वर राग झाला का ? आणि सर्वात कहर म्हणजे आपण जे काही छापतो, ते प्रस्थापितांनी वाचावं, म्हणून त्यांच्या घरोघरी जाऊन आपलं पुस्तक त्यांना विकायचं. हे प्रस्थापितांवरचं प्रेम, का त्यांच्या-वरचा राग ? चार लोकांनी चटकन् आपल्याकड पहावं, म्हणून "सत्यकथे"ची होळी करायची. कां ? तर सत्यकथा अत्यंत भिक्कार वाङ्मय वशिल्याने प्रसिद्ध करते म्हणून ! ठीक आहे. मी म्हणतो, सत्यकथेची जर तशीच पद्धत असेल, तर त्याचा राग तुम्हाला कां यावा ? मराठी वाङ्मयाचा तुम्ही इतका पुळका कां बाळगावा ? इतकं कोणतं वाङ्मय तुम्ही स्वतः निर्माण केलं आहे ? आम्ही एवढं लिहून ठेवलं आहे, किंवा लिहिणार आहोत, असा दावा नको. प्रत्यक्षात काय बाहेर आलंय, तिथे बोट दाखवा.

खरा प्रश्न हा आहे की, सत्यकथेवर या संतप्तांचा जो आक्षेप आहे, तोच आक्षेप त्यांना इतर मासिकांवरही घेता येईल. इतर मासिकांतूनही अत्यंत प्रखर वशिलेबाजी चालू आहे, त्याचा या संप्त-प्तांना कां राग येत नाही ? केवळ सत्यकथेवरच तेवढा कां राग ? खरं तर संतप्त साहित्यिक म्हणून आज जे कुणी मिरवीत असतील, त्यातील निम्म्या साहित्यिकांचं वाङ्मय सत्यकथेनेच प्रसिद्ध केलेलं आहे. (ज्या "येरु"च्या संपादकांनी सत्यकथेची होळी केली, त्या संपादकत्रयीतील एक संपादक तुलसी परब हे सत्यकथेतच कविता लिहीत होते) या सर्वांना सत्यकथेतील तथाकथित भिक्कार वाङ्मयाचा नेमका आजच कसा साक्षात्कार झाला ? या संतप्त साहित्यिकांच्या जन्मापूर्वीपासून सत्यकथा नियमित प्रसिद्ध होत आहे. खरं तर प्रस्थापित साहित्यिक आणि ज्यांचा मराठी वाङ्मया-बरोबर काही संबंध आहे, असा एक विशिष्ट वाचकवर्ग सत्यकथेचा

आहे, या वाचकांच्या हातात आपण लिहिलेलं पडत नाही, सत्यकथा आपलं काही छापत नाही, हीच या संतप्तांची खरी चीड आहे. पण ही चीड काही स्वयंभू चीड नाही. त्या चिडीमागे सत्यकथेसंबंधी एक प्रकारचा हेवा आहे, ही गोष्ट स्पष्ट आहे.

सत्यकथेचा जर निषेधच करायचा होता, तर तो निषेध फार चांगल्या प्रकारे व्यक्त करता आला असता. "शब्द" या मराठीतील पहिल्या "लिट्ल मॅगेझिन"ने सत्यकथेचा जो अप्रत्यक्षपणे निषेध केला होता, तो वाखाणण्याजोगा आहे. आरती प्रभूंच्या काही चांगल्या कविता सत्यकथेने जेव्हा परत पाठविल्या, त्यावेळी सहज एके ठिकाणी चर्चा चालू असताना रमेश समर्थ ("शब्द"चे संपादक) अरुण कोलटकरांकडे सहज म्हणाले, "असं जर असेल, तर आपण एक मासिक–खास करून कवितांसाठी–सुरू करू." ही कल्पना अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, बंडू वझे यांनी उचलून धरली, आणि "शब्द" सुरू झाले. हा इतिहास खुद्द रमेश समर्थ यांनीच मला वारंवार सांगितला आहे. 'लिट्ल मॅगेझिन्'ची मूळ कल्पना रमेश समर्थ यांचीच. पुढे मग अनेक तशा प्रकारची मासिकं सुरू झाली. याच "शब्द"ने कुणालाही अकारण-सकारण शिव्या न घालता, "तयाचि माये गाढवे झविजे"सारखा शीलालेख न प्रसिद्ध करता (सत्यकथेचा निषेध करण्यासाठी "येरु"ने प्रसिद्ध केला होता.) सत्यकथेचं नावही न घेता लोकप्रियता मिळवली. आपला खास असा दर्जा तयार केला. आणि म्हणूनच "शब्द"ची कामगिरी आज कुणीही अमान्य करीत नाहीत. प्रा. पु. शि. रेगे, विंदा करंदीकर, वसंत बापट, मंगेश पाडगांवकर, दिलीप चित्रे, मनमोहन, आरती प्रभू, रमेश तेंडुलकर आदि सत्यकथेचेच कवि "शब्द"मधून कविता लिहीत होते. "लिट्ल मॅगेझिन"चं यश हे असं असतं, होळी करण्यात नसतं. पण या यशासाठी निष्ठा, श्रम, जिद्द हवी असते. एरव्ही चार लोकांना शिव्या घालणं आणि सत्यकथेची होळी करणं, या कुणालाही जमण्याजोग्या गोष्टी आहेत. त्यासाठी स्वतःच्या हातात एखादे अनियतकालिक तरी कशाला हवे ?

या संतप्तांच्या अनियतकालिकांचे आणि त्यांच्या पुस्तकांचे स्वरुप तरी दर्जेदार–वाचनीय असावं, तर तसंही आढळत नाही. कुणी स्वतःची ओळख करून देताना आपण १९६९ सालात आत्महत्या करून मरणार, असं सांगतो. कुणी आपल्याला मध्यरात्रीचा संभोग आणि अंड्याची आमटी आवडते असं स्वतःची ओळख करून देताना सांगतो. लेखकाने स्वतःचा परिचय करून देऊ नये, या मताचा मी नाही. पण वाङ्मयाचा आणि स्वतःच्या परिचयाचा काहीतरी संबंध असायला हवा, तो आढळत नाही. आत्महत्या, मध्यरात्रीचा संभोग, अंड्याची आमटी याचा, आणि त्यांच्या कवितांचा अर्थाअर्थी काय संबंध आहे, हे मला पडलेलं कोडं आहे. बरं, आत्महत्या, संभोग, अंड्याची आमटी, याचंही प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयात दिसत नाही, याचा अर्थ काय ? या विसंगतीचा मेळ लावायचा कसा ? याचा अर्थ स्पष्ट आहे, की ही मंडळी भर रस्त्यातून आज विवस्त्र अवस्थेत फिरत आहेत आणि येन केन प्रकारे चार लोकांचं लक्ष आपल्याकडे वेधून घेत आहेत. आपल्याला केवळ प्रसिद्धी पाहिजे आहे, असंही ही मंडळी हिंमतीने बोलायला तयार नाहीत. मग हा जो सगळा धुडगूस ही मंडळी आज घालीत आहेत, तो नेमका कशासाठी ?

खरं तर प्रत्येक रद्दीवाला हातात सापडेल त्या मासिकाची वाङ्मयीन पातळी न पहाता, बेधडक "पिशव्या" तयार करीत असतो. मग तो रद्दीवाला एकंदरीत सर्वभाषीय वाङ्मयाबद्दल उदासीन आहे, असं समजून त्यालाच या संतप्तांचा "गुरु" कां म्हणू नये ? यावर कुणी म्हणेल, तो ते सहेतुक करीत नाही. मग या संतप्तांकडे तरी कोणता हेतु आहे ? वेळेवर गाडी पकडणं, कुणाची तरी बांधिलकी स्वीकारून आठ तास कारकुनी करणं, वरिष्ठांचे दोन शब्द ऐकणं, नियमितपणे दोन वेळ जेवणं, खाली मान घालून जीवन जगणं, व्यवस्थित दाढी करणं, किंवा (सहेतुक) वाढविणं, या 'संतप्त' चौकटीत न बसणाऱ्या गोष्टी ज्याअर्थी यांना जमतात, त्याअर्थी ही मंडळी मुळात संतप्त नाहीत, पण केवळ आपण कुठे तरी फेकले जाऊ, या भीतीपोटी आपलं अस्तित्व सतत लोकांच्या पुढे ठेवण्याचा खटाटोप करीत आहेत, एवढीच गोष्ट आपल्या लक्षात येते. प्रसिद्धीसाठी तुम्ही हपापले आहात, असा जरी यांच्यावर आरोप केला, तरी हा आरोप हे संतप्त अमान्य करतात. "संतप्त संतप्त" "तापसी तापसी" हा नवा "चित्रपट" ज्याने सुरू केला, त्या राजा ढालेने स्वतःचा फोटो "हाय्" आणि "फ्री प्रेस बुलेटीन"मध्ये "मराठीतला अँग्री यंग मॅन्" या शीर्षकाखाली छापू दिलाच ना ? मग आम्ही प्रसिद्धीचा आरोप केला, तर संतापायचं कारण काय ?

ही मंडळी स्वतःच्या संतापाबरोबर पण एकनिष्ठ रहात नाहीत, म्हणून मला यांचा संताप खोटा वाटतो. मुळात संताप नेहमी खराच असतो. पण तो काही काळापुरता मर्यादित असतो. कुणाचाही संताप कायम स्वरूपात कधीच रहात नाही. असं असताना स्वतःला कायम स्वरूपात "संतप्त" अशी पदवी लावून घ्यायचं कारणच काय? (तरी मी यांना "तापसी" मानायला तयार नाही.) खरा संतापी कुठल्याही परिणामाची पर्वा करीत नाही, हे जगजाहीर आहे. असं असताना "संतप्त साहित्यिक राजा ढाले" हे किती "भयंकर संतप्त" आहेत, याचं प्रत्यंतर मला आलेलं आहे. "दैनिक चक्रवर्ती"च्या पहिल्याच अंकात सूत्रधार राजा ढालेने "सत्यकथेसंबंधी दिलीप चित्रे यांचे विचार" या शीर्षकाखाली काही मजकूर प्रसिद्ध करून दिलीप चित्रे सत्यकथेचे लेखक असून ते स्वतःच सत्यकथेची कशी टिंगल करतात, ते वाचकांना अप्रत्यक्षपणे सांगितलं. अशा प्रकारची बातमी प्रसिद्ध केल्यावर चित्र्यांचं आणि सत्यकथेचं थोडंफार बिनसेल अशी राजा ढाले यांची कल्पना होती का ? शिवाय जो सत्यकथेत लिहितो, त्याने सत्यकथेचा सतत उदोउदोच केला पाहिजे असा काही नियम आहे का ? (नारायण पेडणेकरांवर लिहिताना मात्र हाच राजा म्हणतो : "आम्ही सत्यकथेची होळी केली, तर हा कां चिडतो, तर हा सत्यकथेचा लेखक कवि वगैरे म्हणून." सत्यकथेचा कैवार घेतला म्हणून पेडणेकरांवर राग, मग






अनुक्रमणिका

सत्यकथेची टिंगल करणाऱ्या चित्र्यांबद्दल ढाले यांना प्रेम कां असू नये ? पण ढाले यांचा खरा "भित्रे"पणा हा आहे की, त्या बातमीला कंस काढून "आमच्या खास वार्ताहराकडून" असं त्यांनी छापलं आहे. त्यावेळची वस्तुस्थिती मला माहीत आहे. "येरु"चा अंक राजा ढाले यांना दिलीप चित्रे यांना—दिलीप प्रस्थापित साहित्यिक असूनही विकायचा होता, म्हणून मी केवळ "कंपनी" देण्यासाठी त्यांच्याबरोबर दिलीप चित्रे यांच्या घरी गलो होतो. (प्रा. मे. पं. रेगे, प्रा. माधव मनोहर, अॅड. अनंत दातार, डॉ. मनोहर तेंडुलकर आदि "प्रस्थापितां"कडून "येरु" "चक्रवर्ती"साठी पैसे जमवायला राजा ढाले मलाचं घेऊन गेले होते) तिथे दिलीपचं आणि राजाचं जे बोलणं झालं, ते बोलणं म्हणजेच चक्रवर्तीमधली बातमी ! (उदा: सत्यकथेची होळी आहे, हे तुम्हीं माहीम-बांद्रे रेल्वे लाईनीतल्या पाईपावर लिहून ठेवायचं, चर्चगेट स्टेशनातल्या संडासात लिहून ठेवायचं. . .वगैरे दिलीप जे बोलला ते ! ) अशी वस्तुस्थिती असताना हा "संतप्त" राजा "मी आणि सिनकर जेव्हा दिलीपकडे मेलो होतो. अशी सुरुवात करून बातमी छापायला कां घावरला ? कां त्याने 'कंसा'चा आधार घेतला ? खरा संतप्त कुणालाच घावरत नाही. मग 'संतप्त' हे नवं 'फॅड' जन्माला घालणाऱ्या राजाने दिलीपला कां घांवरावं ?

व्यक्तिशः राजा ढाले यांचा जर प्रस्थापितांवर राग असेल, तर तो तरी त्यांनी नीट ठेवावा, तर तसंही घडत नाही. "ललित"सारख्या प्रस्थापित मासिकातून राजाने आपल्या अनियतकालिकांच्या जाहिराती दिल्या. "अभिनव प्रकाशन"सारख्या प्रस्थापित प्रकाशन संस्थेने आयोजित केलेल्या परिसंवादात राजाने भाग घेतला. परिसंवाद संपल्यावर राजा माझ्यासमोरच श्री. केशवराव कोठावळे यांना म्हणाला, "आता माझी 'डेस्डीमोना' छापा." कां ? केशवराव प्रस्थापित प्रकाशक नाहीत ? (केशवरावांनी ती कादंबरी छापावी न छापावी, तो त्यांचा स्वतंत्र प्रश्न आहे. मी फक्त या लेखा-पुरतं, 'प्रस्थापित' प्रश्नावर जरूर वाटलं, म्हणून हे उदाहरण देत आहे.) "चक्रवर्ती"चे सर्व अंक "अभिनव प्रकाशन", आणि "मॅजे-स्टिक प्रकाशन" संस्थेच्या कार्यालयात विक्रीसाठी ठेवण्यात आले होते, कां ? या दोन संस्था प्रस्थापित नाहीत ? मग राजा असं सांगतोच कसा, आमचा प्रस्थापितांवर राग आहे आणि आम्ही प्रस्थापितांविरुद्ध लढतोय असं ? "ललित" दिवाळी अंक १९६८—मध्ये राजा ढाले यांचा लेख प्रसिद्ध झाला होता, तो कसा ? कां त्यावेळी राजाला प्रस्थापितांचा राग येत नव्हता ? सत्यकथेत राजाच्या अनियतकालिकांची "साभार पोच" आढळते, ती कशी ? जे मासिक अत्यंत भिक्कार वाङ्मय—तेही वशिल्याने प्रसिद्ध करते, त्या मासिकात आपल्या पुस्तकावर अभिप्राय यावा अशी अपेक्षा हे संतप्त बाळगतातच कसे ? अशी किती प्रश्नचिन्हं उपस्थित करा-यची ? तूर्त हे प्रकरण इथेच सोडून मी या संतप्त तरुणांच्या 'दैनिक चक्रवर्ती'कड वळतो.

"दैनिक चक्रवर्ती" चे सर्व अंक या क्षणाला माझ्यासमोर टेबला-वर आहेत. हे सर्व अंक नीट चाळले तर पदरी निराशाच पडते. वाटलं होतं, ही मंडळी आता काही तरी भव्य दिव्य अशी वाङ्मयीन क्रांती या दैनिकाच्या आधारे करतील. चक्रवर्तीचं श्रेय एवढंच की, वाङ्मयीन दैनिक उपलब्ध नव्हतं, ते काही दिवसांपुरते का होईना, पण उपलब्ध झालं, हेच फक्त भूषणास्पद ! एरव्ही चक्रवर्तीच्या सर्व अंकातील मजकूर गोळा केला, तर हातात रुपयातले दहा पैसे तेवढ सापडतात. मनोहर ओक यांच्या सहा कवितांपैकी एक कविता, तुलसी परबच्या संपूर्ण कवितेतील अर्धी कविता, जयंत नेरुरकर, वसंत अबाजी डहाळे यांची एकेक कविता, अशोक शहाणेच्या संपूर्ण लेखातील अर्धा लेख (खरं तर या लेखावर बरेच घाव घालता येतील.) "ओयॅसिस्"ची राजाने करून दिलेली माहिती, चंद्रकांत खोतचं स्पष्ट निवेदन, एवढा भाग सोडला, तर बाकीचा मजकूर खचितच वाचनीय नव्हता. सत्यकथेला शिव्या, "येथे थोबाड रंगवून मिळेल" हे सदर, आज जन्मणारं मूल अत्यांसारखं चावट असेल, अशी ग्वाही. चंद्रकांत खोत या वर्षी आत्महत्या करीत आहेत, त्यांना आम्ही सुयश चिंति ो, अशी बातमी. ही काय वर्तमानपत्रीय शैली ? याला काही वाङ्मयीन मूल्य आहे ? जी मंडळी स्वतःच वाङ्मयीन मूल्य पाळीत नाहीत, मानीत नाहीत, त्यांना दुसऱ्यांच्या वाङ्मयीन मूल्यावर हल्ला करायचा काय अधिकार आहे ?

चक्रवर्तीतून दृष्टीस काय पडलं असेल तर यांच्या आपसातील लाथाळ्या. राजा एकनाथ पाटीलवर टीका करणार, खोतला शिव्या घालणार, खोत त्याला उत्तर देणार, त्याला प्रतिउत्तर काळसेकर देणार, एका अंकात चंद्रकांत पाटीलना शिव्या, दुसऱ्या अंकात त्यांची कविता प्रसिद्ध होणार. सगळा हाच गोंधळ. यांचे वाङ्मयीन विचार समजायला त्यांच्या हातात माध्यम असूनही काही मार्ग नव्हता. तेव्हा आता त्यांना अशोक शहाणे यांच्याच भाषेत सांगावसं वाटतं, की "बाबानो, तुमचं हे असं लेखनद्वारे प्रकट होण्यात आम्हांला काही स्वारस्य नाही."

बनारस हिंदू विद्यापीठातील विद्यार्थ्यांवर जो अन्याय झाला, त्या अन्यायाविरुद्ध चक्रवर्तीचे सूत्रधार सह्या जमविणार आहेत अशी एक बातमी चक्रवर्तीमध्ये प्रसिद्ध झाली आहे. ही प्रखर प्रति-क्रिया मला स्वतःला आवडली. हे संतप्त ज्याअर्थी मुंबई विद्यापीठाचे विद्यार्थी आहेत, त्याअर्थी दुसऱ्या विद्यार्थ्यांवर होणारा अन्याय ते सहन करणार नाहीत आणि त्यांनी सहन करू नये, हे योग्यच आहे. पण मुंबई विद्यापीठाकडून फी वगैरे बाबतीत विद्यार्थ्यांवर जो अन्याय होतो, त्याविरुद्ध हे संतप्त काय करणार आहेत ? (बहुधा बनारस विद्यापीठातील विद्यार्थ्यांना मुंबई विद्यापीठाविरुद्ध सह्या जमवायला सांगतील.) किंवा "साहित्य सहकार" (ऑगस्ट १९६९) मध्ये श्री. जयवंत दळवी यांनी विद्यापीठासंबंधी जो धोका दाखवला आहे, तो धोका या संतप्तांना दिसत नाही का ? (खरं तर तरुणांना चेतविण्याची ही चांगली युक्ती. खुद्द दळवी तरी गप्प कां रहातात ?






एक "सामाजिक प्रश्न" म्हणून ते या प्रश्नाकडे पहायला तयार आहेत काय ?) या संतप्तांना तोही धोका दिसतो. पण ते गप्प बसतील. काहीही करणार नाहीत. मुंबईपासून शेकडो मैल लांब असलेल्या एका विद्यापीठाचा ते मुंबईत राहून निषेध करतील, पण मुंबई विद्यापीठाचं ते नावही उच्चारणार नाहीत. कारण त्यांना त्याच विद्यापीठातून पदव्या घ्यायच्या आहेत.

वाराणसीहून जेव्हा 'आमुख'च्या कंचनकुमारचं पत्र आलं, (ते पत्र चक्रवर्तीत छापलं आहे.) तेव्हा मला वाटलं होतं, ही मंडळी आता 'भयंकर संतापून' निषेध म्हणून "सत्यकथे"सारखी बनारस विद्यापीठाच्या इमारतीची पण 'होळी' करणार. पण तसं घडलं नाही. त्या बाबतीत केवळ सह्या जमवून निषध व्यक्त केला जाणार आहे. मग त्याच पद्धतीने सत्यकथेचा निषेध कां नाही झाला ? याचा अर्थ असा होतो की, जिथे आपला 'तमाशा' चालवून घेतला जातो, तिथे होळीसारखा प्रकार करायची यांची पद्धत तरी असावी, किंवा यांचा संताप सौम्य तरी झाला असावा. 'येरु'च्या संपादकांना मी इतर मासिकांतील वशिलेबाजी पुराव्याने सिद्ध करून द्यायला तयार आहे, पण मी सिद्ध केल्यावर ते त्या मासिकाची होळी करायला तयार आहेत काय ? तिथे आपला संताप व्यक्त करायला तयार आहेत काय ?

खरं तर हे स्वतःला कोणत्या तोंडाने संतप्त म्हणवून घेतात ? आचार्य अत्र्यांनी अशोक शहाणे, अरुण कोलटकर, दिलीप चित्रे, भाऊ पाध्ये, चिं. त्र्यं. खानोलकर, (आणि मी पण) यांच्यावर जेव्हा त्यांच्या वाङ्मयीन कामगिरीमुळे अत्यंत गलिच्छ अशी अर्वाच्य टीका केली, त्यावेळी "लेखक लेखक" म्हणविणारे "प्रस्थापित" पण मागे पळाले. पण त्यावेळी हे संतप्त कुठे होते ? एकाची ताकद झाली नाही, अत्र्यांचा निषेध करायची. चित्रे, खानोलकर सोडा, कारण ते सत्यकथेचे लेखक. पण अरुण, भाऊ, अशोक, हे तर या संतप्तांचे दोस्त होते ना ? त्यातून अशोकला ही मंडळी "गुरु" मानतात, त्यावेळी यांचा संताप कुठे गेला होता ? जो "संतप्त"नाही, त्या दिलीप चित्रेने "अभिरुचि"मधून अत्र्यांवर वार करायला सुरवात केली. अत्र्यांच्या हाताखाली नोकरीला असूनही केसरी प्रधानने "भारुड"मधून अत्र्यांवर टीका केली. याला म्हणतात संताप ! एखादा अंक जाळणं, चार लोकांना शिव्या घालणं, ही "संतप्तां"ची लक्षणं नाहीत.

या होळीच्या संदर्भात एका प्राचार्यांनी फार चांगलं मत दिलं आहे. त्यांचं म्हणणं असं की, महिलांच्या मासिकांतून महिलांसाठी पदार्थ कसे करावेत, असं सदर असतं, पण तसे पदार्थ होत नाहीत, म्हणून महिलांच्या मासिकांची आपण होळी करू का ? मग सत्यकथेची कां होळी करायची? या एका प्रश्नाने 'होळी' करणाऱ्यांचं पितळ उघडं पडलं आहे, यात शंका नाही. अनेक प्रस्थापित प्रकाशक-लेखक माझे मित्र आहेत म्हणून त्यांच्यावर माझी 'छाप' पाडण्यासाठी मी हा 'छापा' घातलेला नाही. "संतप्त साहित्यिक" कसे भ्याड असतात, आत्मप्रौढीसाठी कसे हपापलेले असतात, हे सामान्य वाचकांना कळावं, एवढ्यासाठीच प्रस्तुत प्रपंच उभारला आहे. खरं तर हे संतप्त साहित्यिक माझे जवळचे मित्र आहेत. आमच्या नेहमीच गाठीभेटी होत असतात. यांचं 'खासगी जीवन' पूर्ण परिचित आहे, यांचं पुढे काय होणार, हेही मी समजू शकतो. एखादाने नवा चित्रपट प्रसिद्ध होतो. थोडाफार चालतो आणि कालांतराने तो लोकांच्या लक्षांतही रहात नाही. हे संतप्त, आणि त्यांची वाङ्मयीन चळवळ म्हणजे "देमार घाटणीचा कलाहीन चित्रपट" आहे. हा काही फार दिवस चालणार नाही आणि लोकांच्या तर मुळीच लक्षात रहाणार नाही. माझं अजूनही माझ्या या तथाकथित संतप्त मित्रांना आव्हान आहे की, जे कुणी स्वतःला "तापसी, संतप्त, बीटनिक, अँग्री यंग मॅन" म्हणतात, त्यांनी बेधडक पुढे येऊन तसं छातीठोकपणे जाहीर करावं. माझं हे आव्हान एकजणही स्वीकारणार नाही, याची मला खात्री आहे. कदाचित राजा ढाले पुढे येतील; पण बहुधा तेही पुढे येणार नाहीत. कारण ते मुळातच 'संतप्त' नसावेत. असते तर "अभिनव प्रकाशना"ने आयोजित केलेल्या परिसंवादात "संतप्तां"-च्याच विषयावर बोलताना त्यांने "माईक"वरून ओरडून तसं जाहीर केलं असतं.

प्रस्तुत लेखाची लेखमर्यादा संपल्याची जाणीव असूनही एका गोष्टीचा खुलासा करणं आवश्यक आहे. "चक्रवर्ती"च्या चक्रात माझं नाव आहे. याचा अर्थ मी संतप्त आहे का ? मुळीच नाही. चक्रातील नावे लेखक, कवी, सहाय्यक, यांची होती. त्यातील किती मंडळी संतप्त होती. ते मला माहीत नाही, राजा ढाले माझे मित्र असल्यामुळे मी त्यांना दैनिकाच्या कामात मदत करीत होतो, आणि चक्रवर्तीत माझ्या एका अपूर्ण कवितेचा काही भाग प्रसिद्ध झाला आहे, एवढाच माझा दैनिकाशी संबंध होता.

या लेखाला कदाचित "येरु"तून उत्तर येईल. (हे मासिक प्रस्थापितांचं आहे, म्हणून ! ) पण "श्रीकांत सिनकर दारू पितो", किंवा "वेश्यकडे जातो" असं "चक्रवर्ती छाप" उत्तर राजा देणार असेल, तर खचितच मला हंसू यईल. [ मी माझं खासगी जीवन कसं जगतो, ते प्रामाणिकपणे सांगण्याचा धीटपणा म्हटलं तर बेशरमपणा माझ्या अंगी आहे. तितका मी "अँग्री यंग मॅन्" आहे. ] पण मुद्देसूद उत्तराची अपेक्षा मी बाळगली आहे. मला तत्त्वचिंतनात्मक, बोजड, भारदस्त, दुर्बोध, भाषेत लिहिणं जमत नाही. मला तसं आवडतही नाही. प्रतिक्रिया खणखणीत व्यक्त झाल्या पाहिजेत . . . निदान या बाबतीत तरी प्रस्थापितांची शैली नको.

जाता जाता दिलीप चित्रे यांनी या संतप्तांबद्दल माझ्याजवळ जे उद्गार काढले, ते मला स्वतःला तरी अत्यंत समर्थक आणि चपखल असे वाटतात. त्यांचं म्हणणं असं : "इतके दिवस ही मंडळी "पडद्या-आड" बसत होती. आता चक्क "खिडकी"त येऊन बसली आहेत. एकंदरीत ही सर्व "वाङ्मयीन नक्षलबाडी" सध्या चालू आहे." सूज्ञांस एवढंच पुरे!

● ● ●

अनुक्रमणिका









# कर्णाचे मोठेपण त्याच्या दुर्दैवात

**श्री. आनंद साधले** यांच्या 'महापुरुष' कादंबरीसंबंधी गुणदोषांची चर्चा करणारे विस्तृत पत्र मराठवाड्यातील ख्यातकीर्त विद्वान प्रा. नरहर कुरुंदकर यांनी श्री. साधले यांजकडे पाठविले होते. तेच पत्र श्री. साधले आणि प्रा. कुरुंदकर यांच्या संमतीने येथे उद्धृत केले आहे—**संपादक**.

प्रिय आनंद साधले,

सप्रेम नमस्कार.

येथे आल्यानंतर व सुटया संपल्यानंतर आता कॉलेज सुरू झाले आहे. प्रवास, व्याख्याने संपवून आता स्थिरावलो आहे. कॉलेज सुरू असल्यामुळे पुष्कळच रिकामा वेळ मिळतो आहे. सुटयात तो मिळत नाही.

येथे आल्यानंतर तुमची 'महापुरुष' ही कादंबरी वाचली. त्या संदर्भात हे पत्र. मी काही औपचारिक लिहावे अशी तुमची इच्छा नसणार. मी औपचारिक लिहिणारही नाही. मला कादंबरी आवडली. मात्र ती कादंबरी नव्हे ! कादंबरीच्या पद्धतीने मांडलेला तो एक वैचारिक लेख आहे. जुन्या काळापासून एखाद्या कथेच्या द्वारे आपला विचार मांडण्याची पद्धत आजतागायतपर्यंत चालू आहे. अशा ठिकाणी लिखाण रोचक होते. रंजक होते. त्याप्रमाणे तुमची कादंबरी वाचनीय, रोचक व रंजक झाली आहे. कादंबरीकाराच्या जवळ जे गुण असावे लागतात त्यातील बहुतेक सर्व गुण तुमच्याजवळ आहेत. तुम्ही कथानक मांडू शकता, ते फुलवू शकता, वर्णन करू शकता आणि हे सगळे वाचनीय करू शकता.

पण तुम्ही कादंबरीकार नाहीत. तुमचा पिंड वैचारिक आहे. एका विशिष्ट सूत्रात तुम्हाला कर्ण पहावयाचा होता. तसा तुम्ही पाहिलेला आहे. खऱ्या कलावंताची ही पद्धत नसते. एखाद्या पूर्वनियोजित सूत्रात एखादी घटना किंवा व्यक्ती पाहाण्यामुळे आपण जीवनाची विविध परिमाणे असलेला विस्तार गमावतो आणि एक सूत्र तेवढे सांभाळतो. तुमच्या मनाशी सूत्रे आहेत. तुमच्यासमोर कर्ण हा माणूस नाही. कर्तृत्ववान, गुणवान पण पददलित अशा अवस्थेतील कर्ण तुम्हाला दिसतो. माणूस तुमच्या समोर उभा राहू शकत नाही. त्यामुळे लिखाण परिणामकारक झाले तरी कलात्मक होत नाही. आपण एक कलावंत आहो व कलाकृती घडवीत आहो असे तुम्हालाही वाटत नसणार त्यामुळे तुमचे लिखाण कलात्मक झाले नाही किंवा होण्याचा संभव नाही याची तुम्हाला हळहळ वाटणार नाही. प्रत्येक पुस्तक कलाकृती झालेच पाहिजे असा माझाही वेडा हट्ट नाही. जीवनाला कलेखेरीज इतर कक्षा आहेत. आणि जे ज्या हेतूसाठी लिहिले त्या हेतूसाठी सफल झाले तर मग कोणतीही हळहळ वाटण्याचे कारण नाही.

कधी कधी माझ्यासमोर कर्ण माणूस म्हणून उभा राहतो. असा माणूस की ज्याला मरणाच्या सावलीखाली सतत वावरावे लागते. लग्नापूर्वीच त्याला गुरुगृही शाप मिळाला आहे, की मरणाच्या सीमेवर तुला तुझी अस्त्रविद्या आठवणार नाही. पुढेही एक शाप आहे. मरणाच्या सीमेवर भूमी तुझ्या रथाचे चाक गिळील. हे कावरेबावरे शापित जीवन मरणाच्या छायेत वावरत कसे असेल? अस्त्रविद्या विसरते की काय या धास्तीने कसे पछाडलेले असेल ? आणि युद्धाच्या प्रत्येक क्षणी रथाच्या चाकाकडे पुनःपुन्हा त्याचे लक्ष जात कसे असेल ? हा विचार माझ्या मनात येतो. निष्कारणच फाशीची शिक्षा झालेल्या पण जगण्याची इच्छा असलेल्या मानी माणसाचे मन कसे असेल ? कर्णाचे मन असेच असेल काय ? हा विचार माझ्या मनात पुनःपुन्हा डोकावून जातो. तुम्हाला दोन्ही शाप वर्ज्य करणे सोपे वाटते. कारण तुमच्या सूत्रात हा भाग बसत नव्हता. तुम्हालाच नव्हे, शिवाजी सावंतानाही रथचक्र गिळणे या गोष्टीचे

संभाव्य स्पष्टीकरण करण्यात रस वाटला. मरणाचा शाप मिळालेला माणूस कसा असतो यात मात्र रस वाटला नाही.

मी शिवाजी सावंतांची 'मृत्युंजय' वाचली आहे. पृष्ठसंख्येच्या दृष्टीने ती कादंबरी मोठी आहे. अनेकांनी तिची प्रशंसा केली आहे. खप पहाता वाचकाना ती आवडलेलीही दिसते. पण मला मात्र ती फारशी आवडली नाही. पौराणिक कथा कादंबरी होताना काही प्रमाणात प्रतीकात्म होतात. त्यासाठी लेखकाच्या जवळ उचित आणि स्वीकारार्ह परस्पेक्टिव्ह असावा लागतो. शिवाजी सावंतांच्या जवळ असा परस्पेक्टिव्ह दिसला नाही. माणूस म्हणून कर्णाकडे न पाहण्याची तुम्ही लेखकांनी शपथच घेतलेली आहे. तुमच्या डोळ्यांसमोर भासाचा कर्णभार आहे. तरीही माणूस म्हणून कर्णाकडे पाहण्याची तुम्हाला इच्छा नाही. कर्णाच्या जीवनावरील कादंबरी म्हणजे महाभारतातील पात्रांचे विविध पातळ्यांवरून लेखकाला झालेले आकलन. लेखकाने या व्यक्तिरेखांवर केलेले भाष्य कलात्मकतेचे गुण मी तुम्हाला देऊ शकणार नाही. पण कर्णाकडे पाहण्याची काही दिशा तुमच्याजवळ आहे. नुसते महाभारत पानोगनती उतरून घेऊन तुम्ही मान्य केले नाही. कारण महाभारत उतरूनच घ्यावयाचे म्हटल्यावर पानांची संख्या कितीही होऊ शकते. त्या दृष्टीने 'मृत्युंजय'पेक्षा 'महापुरुष' मला अधिक वाचनीय वाटली.

तुमच्या कादंबरीतील मला आवडलेल्या व एकदम स्वीकारार्ह वाटलेल्या काही बाबी मी नोंदवितो–त्या ठिकाणांची संगती मला एकदम आवडली —

(१) तुम्ही कर्ण नदीतून वाहत सोडला नाही, तर नदीकाठी ठेवला. जिवंतपणीच वाहत जाणारी मंडळी स्वीकारण्यापेक्षा वाहत्या जीवनाच्या काठी जिवंत असणारी मंडळी मला जास्त महत्त्वाची वाटते.

(२) कर्णाच्या साठी सोबत सोने ठेवलेले होते म्हणून वसुशेषा हे त्याचे नाव ठेवले ही कल्पनाही योग्य वाटते. रुक्मिणी या नावाचा उलगडाही असाच आहे. रुक्म म्हणजे सोने. सुवर्णासह आली ती रुक्मिणी. नावावरून माग घ्यावयाचा तर कृष्णाने नुसते रुक्मिणीहरण केलेले दिसत नाही. हा बोलून चालून राक्षसविवाहच होता. कदाचित लूटही मोठी आणली असेल.

(३) सूर्य आणि कुंती असा सांधा जोडण्याऐवजी व हा सांधा जोडून कर्ण सूर्यपुत्र करण्याऐवजी राधा व अधिरथ हे सूर्योपासक. त्याना सूर्याच्या उपासनेनंतर प्राप्त झालेला उपासनापात्र पुत्र म्हणून कर्ण सूर्यपुत्र; अशी तुमची संगती आहे. माझी याला हरकत नाही. पण काय हो, राधेला खरोखरीच पान्हा फुटला आणि तिच्या स्तनांतून दूध येऊ लागले या चमत्काराची गरज तुम्हाला का वाटावी ? ज्या मुलांच्या जन्मतःच आया मरून जातात त्याना वरदुधावर पालनपोषण करता येत नाही अशी तुमची वैद्यकीय खात्री पटलेली आहे काय ?

(४) नियोगाच्या दृष्टीने विचार केला तर कुंती व माद्रीवर खरा हक्क धृतराष्ट्राचा होता. पुत्रप्राप्तीसाठी पंडूला हिमालयात जाण्याची गरज नव्हती. हा धृतराष्ट्राचा हक्क टाळला गेलेला आहे. याकडे माझ्या माहितीप्रमाणे तुम्ही प्रथमच लक्ष वेधता. हा मुद्दा मला मार्मिक वाटला.

(५) कृष्ण दुर्योधनाकडे शिष्टाईस जाण्यापूर्वी कृतवर्म्याच्या नेतृत्वाखाली यादवसेना हस्तिनापुरात हजर झालेल्या होत्या. त्यामुळे कृष्णाला कैद करणे शक्य झाले नाही. ही तुमची भूमिका अशीच मार्मिक आहे, आणि या स्पष्टीकरणाला महाभारतात अंधुक आधारही आहे. कारण कृष्ण पांडवांकडे आणि यादवसेना दुर्योधनाकडे ही वाटणी शिष्टाईच्या पूर्वी होऊन गेलेली आहे.

(६) कादंबरीचे सगळे सहावे प्रकरणच आवडले. अतिशय चांगले वाटले. द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगी कठोर न्याय सांगताना का होईना पण कर्ण सूडाने पेटला व वरच्या स्थानाहून ढळला हे अमान्य करण्यात अर्थ नाही. तुम्ही ज्या पद्धतीने हे सगळे प्रकरण रंगविले आहे त्या पद्धतीने सभापर्वातील अडसष्टाव्या अध्यायातील श्लोक पस्तीस छत्तीस, एकाहत्तराव्या अध्यायातील श्लोक सात व बाहत्तराव्या अध्यायातील पहिला श्लोक यांची संगती आपण फार मार्मिकपणे दाखवलेली आहे. तुम्ही सांगता त्या पद्धतीने कर्णाच्या व्यक्तित्वाला नवा अर्थ प्राप्त होतो यात वाद नाही.

महाभारताप्रमाणे कृष्णाने कर्णाला पांडवांच्या बाजूस येऊन मिळण्याचे आवाहन केले होते. या आवाहनात वडील भाऊ म्हणून राज्य मिळण्याची सोय होती. जन्मभर हीन कुलामुळे अवमानित झालेल्या या पराक्रमी पुरुषाला उच्चकुलीन होण्याची सोय होती. दीर्घकालीन अभिलाषित द्रौपदी पत्नी म्हणून मिळण्याची सोय होती. कर्ण हे आमंत्रण नाकारतो हा कर्णाच्या जीवनातील अतिशय उदात्त क्षण आहे. हा मोह टाळताना कर्ण जी कारणे देतो त्यात पत्नी, मुले, सुना, कौटुंबिक मोह यांचाही समावेश आहे. कर्णाच्या जीवनात अतिशय सुखी संसार हा एक विरंगुळा दिसतो. असे अनुमान यातून काढता येईल. या धाग्याचा तपशीलवार विस्तार म्हणजे तुमच्या कादंबरीतील वसुंधरा.

कर्णाच्या जीवनात मायेचे आणि ममतेचेही एक स्थान आहे. पण कादंबरीच्या रचनेच्या दृष्टीने वसुंधरा आणि कर्ण यांचा शृंगार इतक्या विस्ताराने दाखविणे आवश्यक आहे काय ? पतिपत्नीसंबंधात त्यांच्या एकजीवपणात वासनेचा भाग एक महत्वाचा भाग आहे हे मान्यही केले तरी मनोमीलन, मनाचा एकजीवपणा वासनतूनच उगवतो की काय हाही एक प्रश्न आहे. माझा आक्षेप आपण दाखविलेल्या उत्तर भागातील कर्णवसुंधरेच्या रात्रभराच्या शृंगार चेष्टिताना आहे हे आपण चाणाक्षपणे ओळखले असेलच !

भारतीय युद्धाच्या वेळी निरनिराळ्या मंडळींची वये काय असावीत याविषयी काही भूमिका आपणाजवळ आहे काय ? असलेले महाभारत जसेच्या तसे स्वीकारायचे तर युद्धाच्या वेळी अभिमन्यूचे वय





अनुक्रमणिका

बत्तीस वर्षाचे येते. यापूर्वी अर्जुनाचे बारा वर्षे तीर्थाटण आहे. त्यापूर्वी अर्जुन व द्रौपदी विवाह. या विवाहाच्या पूर्वी अर्जुनाची धनुर्विद्या संपली. या सूत्रानुसार भारतीय युद्धप्रसंगी अर्जुनाचे वय पासष्ट, भीम सदसष्ट, धर्म एकुणसत्तर अशी वये येतात. धर्माचा जन्म पंडू व कुंतीचे लग्न झाल्यावर अनेक वर्षांनी झाला. तेव्हा कर्णाचे वय पंच्याहत्तर वर्षाचे आसपास गृहीत धरावे लागते. काहीही असले तरी भारतीय युद्धात कर्णाची तरुण नातवंडे आहेत. या युद्धापूर्वी आपण कर्णाचा शृंगार दाखविणार काय ? की तुमच्या वयाच्या गणतीची पद्धत निराळी आहे ? वर्ष म्हणजे एक महिना गृहीत धरूनच वनवासाची बारा वर्षे व तीर्थाटणाची बारा वर्षे ही चोवीस वर्षे दोन वर्षात आटोपता येतात. मग अभिमन्यू एकवीस वर्षाचा येतो आणि अर्जुन पंचचाळीसच्या सुमारास येतो. आपण वयाची कोणती संगती गृहीत धरलेली आहे ?

जेव्हा मी तुमच्या कादंबरीतील मला काय आवडले हे सांगतो त्याचवेळी काय आवडले नाही तेही सांगून टाकतो. महाभारतातील कथानकाचा आवडेल तो भाग घ्यावा, न आवडेल तो सोडून द्यावा ही पद्धत मला आवडली नाही. काय स्वीकारावयाचे आणि काय गाळायचे याच्या ऐतिहासिक अभ्यासपद्धतीच्या काही शिस्ती आहेत. या शिस्ती तुम्हाला मान्य दिसत नाहीत. माझ्यासाठी महाभारत हा इतिहासचाही भाग आहे आणि माझ्या संस्कृतीचाही भाग आहे. माझ्या संस्कृतीचा एक महान ग्रंथ म्हणून सगळेच्या सगळेच महाभारत मला मान्य आहे.



हे महाभारत मान्य केले म्हणजे कर्ण हा दानशूर, वेदवेत्ता, वेदब्राम्हणाचा आदर करणारा धार्मिक पुरुष, पराक्रमी, दाता, दुर्दैवी पण उच्चकुलीन शुद्ध दैवी बीजाचा असा ठरतो. कर्ण स्वतःला भला राधेय समजतो. राधेय समजून त्याची कितीही अवहेलना झाली असो त्याचे राधेयत्व खोटे आहे; खरोखरी तो कौन्तेय आहे; हीच माझ्या संस्कृतीची धारणा आहे.

आमची जुनी पढिक मंडळी आणि बुरसटलेली माणसे हीन कुलात विभूतीमत्व असते हे मान्यच करीत नसत. त्यांच्या दृष्टीने कर्णाचे चांगलेपणा तो मूलतः दैवी उच्चकुलीन असल्याने निर्माण झालेले आहे. कर्णाच्या आयुष्यात डॉक्टर बाबासाहेब आंबेडकर यांचे प्रतिबिंब पाहण्यापूर्वी कर्ण हीनकुलीन आहे याची खात्री करून घ्यावी लागते. "दैवायत्तं कुले जन्म" असे वाक्य कर्णाच्या तोंडी आहे. पण ते खरे नाही. माझी संस्कृती जन्माचे कूळ पूर्वपुण्याईने लाभते असे मानणारी अत्यंत विलक्षण संस्कृती आहे.

महाभारत असे आपण म्हणतो. पण महाभारत म्हणताना तुमच्या डोळ्यासमोर ग्रंथ कोणता आहे, कथानक कोणते आहे हे एकदा स्पष्ट असले पाहिजे. नीलकंठासमोरचे म्हणजे सतराव्या शतकातील महाभारत तुमच्या डोळ्यासमोर आहे का ? तसे असेल तर मग कर्णाच्या जीवनातील काहीही सोडण्याचा तुम्हाला अधिकार नाही. कारण हा कर्ण इतिहासमान्य नसेल पण संस्कृतिमान्य आहे. हाही कर्ण डोळ्यासमोर ठेवण्यास माझी हरकत नाही.

भांडारकर संस्थेने जी चिकित्सक आवृत्ती प्रसिद्ध केली आहे ती तुमच्या डोळ्यासमोर आहे का ? प्रतींच्या तौलनिक अभ्यासावर सिद्ध झालेली ती एक अलौकिक संहिता आहे. हे महाभारत म्हणजे स्थूलमानाने नवव्या दहाव्या शतकातील महाभारत आहे. पण मग या महाभारतात द्रौपदीच्या स्वयंवराला कर्ण हजर नाही. मी सूतपुत्राला वरणार नाही असे म्हणण्याचे द्रौपदीला कारण नाही. द्रौपदी आपल्याला मिळाली नाही म्हणून दंश धरण्याची कर्णाला शक्यता नाही. तुम्हाला स्वयंवरप्रसंगी कर्णाचा अपमान हवा आहे ना ? मग तुम्ही नीलकंठाच्या मागे जाऊ शकत नाही. चिकित्सक आवृत्तीत कर्णाने द्रौपदीला दासी ठरविले आहे पण कृष्णप्रभावाने द्रौपदीची मुक्तता होणारे वस्त्रहरण नाही. मात्र याही महाभारतात तुम्ही गाळलेले प्रसंग आहेत. कर्णाला परशुरामाचा शाप आहे. जन्मजात कवचकुंडले व त्यांचे दान आहे. ब्राम्हणाचा रथचक्र गिळण्याचा शाप आहे. कर्ण दुर्वासाच्या आशीर्वादाने कुंतीला झालेला पुत्र आहे. उत्तर-गोग्रहण आहे. तुम्हाला या बाबी नको असतील तर त्याही मागे जाण्याची तयारी ठेवली पाहिजे.

कर्णाला परशुरामाचा शाप, ब्राम्हणाचा रथचक्र गिळण्याचा शाप या भृगुकुलाच्या कथा आहेत. भृगुकुलाच्या कडून पडलेली भर ज्या महाभारतात नाही त्या महाभारतात म्हणजे सुमारे इसवी सनाच्या तिसऱ्या शतकातील महाभारतात तुम्हाला जावयाचे आहे काय ? याठिकाणी परशुरामाचा शाप नाही, रथचक्र गिळणे नाही, कदाचित या ठिकाणी उत्तर-गोग्रहणही नसेल. पण अजून या ठिकाणी कर्ण सूर्यपुत्र आहे. त्याचे जन्मजात कवचकुंडलाचे दान आहे. याहीपूर्वी जायचे तर तुम्हाला भासापूर्वीच्या महाभारतात जावे लागेल.

म्हणजे आपण इसवीसनापूर्वी तीनशेच्या महाभारतात जाऊ. या महाभारतात मात्र तुम्हाला नको असलेल्या अनेक बाबी नाहीत. परशुरामाचा शाप नाही. रथचक्र गिळण्याचा शाप नाही. उत्तर-गोग्रहणही नाही. म्हणून कर्णाची फजिती नाही. जन्मसिद्ध कवचकुंडल दान नाही. या साऱ्या बाबी तुम्हीही कादंबरीतून टाळलेल्या आहेत. पण मग याठिकाणी आल्यावर कर्ण






द्रौपदी-स्वयंवराला हजर नाही. तोही भाग गळला पाहिजे. कर्ण दानशूर असल्याच्या कथा भारतात आहेत. त्या सर्व कथा कवच-कुंडलदान या कल्पनेभोवती वावरणाऱ्या आहेत. कवचकुंडल दान नसले की त्या महाभारतात मग कर्ण दानशूरही नाही. कर्णाचे सगळे मोठेपणच या ठिकाणी हरव-लेले असेल. मग हा मोठेपणाला पारखा झालेला कर्ण दोन दिवस युद्ध करून मारला गेलेला एक दुर्योधनाचा सेनापती इतकाच रहातो. हा कर्ण तुम्हाला हवा आहे का?

कर्णाचे मोठेपण त्याच्या दुर्दैवात आहे. अर्जुनाने जिंकलेली द्रौपदी युधिष्ठिराला आपोआप मिळाली त्याप्रमाणे कर्णाला आपोआप मिळाली असती, तो सम्राट झाला असता, पांडव त्याचे सेवक झाले असते. हे सारे हक्काचे असून त्याला मिळाले नाही. कारण नसताना अवहेलना झाली. अपराध नसताना शाप मिळाले. आणि तरीही तो कडवा मित्रप्रेमी, पराक्रमी आणि दानशूर राहिला. कडवट झाला नाही. हे कर्णाचे मोठेपण ज्या दुर्दैवातून सिद्ध होते त्यासाठी कर्ण कुंतीचा पुत्र असणे भाग आहे. तो कुंतीचा व्यभिचारजन्य पुत्र असता कामा नये. तो सूर्यपुत्रही असला पाहिजे व ही हकीगत पांडवाना अज्ञातही असली पाहिजे. कथानक संभाव्य करण्याच्या आणि कर्णाला न्याय देण्याच्या तुम्हा मंडळीच्या प्रयत्नातून कर्ण कुंतीच्या व्यभिचाराचा अज्ञात विनबापाचा पुत्र होतो. हे झाल्या-नंतर कर्णाच्या अवहेलनेला आमच्या संस्कृ-तीत न्याय्य कारण सापडते. कर्णाचे चित्रण हे ब्राम्ही संस्कृतीचे एक नमुनेदार चित्रण आहे. ज्यात सूतपुत्र म्हणून अवहेलना भोगणे हा कर्णाचा योग आहे. ब्राम्हणाना मात्र त्याच्याकडून सदैव भरपूर दक्षिणा आणि प्रतिष्ठाच मिळाली. हा ब्राम्हणाचा योग आहे. ब्राम्हणी संस्कृती कर्णाचे मोठेपण असेच मानणार. आणि ही संस्कृती कर्ण-कथतून वगळावयाची तर मात्र संस्कृतीचे संस्कार न घडलेल्या प्राचीन सूताच्या महाभारतात कर्णाला कोणते मोठेपणच असण्याचा संभव नाही.

कर्ण पराक्रमी आहे. पण दानशूर. दानशूरत्वामुळे कवचकुंडले गेली पण कीर्ती मिळाली. दयेमुळे वासरू वाचविताना ब्राम्ह-णाचा शाप मिळाला. दृढ गुरुनिष्ठेमुळे गुरुशाप मिळाला. ही तीन दुर्दैवे एकत्र येतात म्हणजे कर्णाची हत्या होते. शेवटी कर्णाला युधिष्ठिराकडून पिंडही मिळतो. संस्कृती त्याचे मोठेपण मान्यही करते.

कर्णाच्या या चरित्रांत तुम्हाला कोणता भाग हवा आहे? भासापासून मान्य अस-णारा संस्कृतीचा कर्ण हवा आहे की भासा-च्याही पूर्वीचा इतिहासाचा कर्ण हवा आहे? तुम्ही सोइस्कर तेवढे घेता. उरलेला भाग अत्यंत मोकळेपणाने नाकारता.

पण कदाचित हा माझा प्रश्नच वेडेपणाचा असेल. कारण तुम्हाला इतिहासाही कर्ण नको. संस्कृतीचाही कर्ण नको. तुम्हाला महाभारतातील कर्णाचे कथानक आज एका विशिष्ट सूत्रात बसवून वापरावयाचे आहे. तुमच्या दृष्टीने विशिष्ट स्पष्टीकरणे करण्या-

साठी कर्णाची कथा एक उपयोगी कथा आहे. महाभारताचा असा वापर करण्याचा हक्क तुम्हाला जरूर आहे. जर खांडेकरांना ययातीची कथा संयम विरुद्ध भोग या सूत्रासाठी वापरावयाची असेल, जर खाडिलकराना कीचकवध राजकारणासाठी वापरावयाचा असेल तर साधले यानाही त्यांच्या सोयींनुसार महाभारत वापरण्याचा हक्क आहे. कारण ती सर्व भारतीयांच्या समाईक मालकीची वस्तू आहे. आज इतक्या वर्षानंतर अजूनही महाभारत वाचावेसे वाटते, वापरणे आवडते हे महाभारताचे एक विलक्षण मोठेपण नाही का ?

हा सारा मला न आवडणारा भाग झाला. महाभारताने दिले आहे ते सर्व स्वीकारून कर्ण रंगविणे यात लेखकाच्या सामर्थ्याची कसोटी आहे. पुराणकथा तर्कसंगत आणि सुसंभाव्य करण्यात अर्थ नसतो. कारण त्या पुराणकथाच असतात. शेवटी संभाव्य करावयाचे तरी कशासाठी ? वाचकाना ते संभाव्य वाटावे याचसाठी संभाव्य करावयाचे ना? पुराणकथाना याची गरज नसते. हजारो वर्षांच्या परंपरानी या पुराणकथा जशा आहेत तशाच संभाव्य म्हणून मान्य केलेल्या असतात. इतिहासात त्या संभाव्य नसतात. संस्कृतीत त्या संभाव्य असतात आणि वाङ्मय हा संस्कृतीचा भाग असतो. हॅमलेटला बापाचे भूत दिसते इथे जर काही खटकत नसेल तर कुंतीला सूर्यापासून पुत्र व्हावा यात खटकण्याजोगे काय आढळावे ? कुंतीच्या भाग्याचा हेवा तुम्हाला आम्हाला कां वाटावा?

एक दोन सूचना देऊ का ? प्रकरण सहामधील श्लोक तेथेच पानाखाली नसावेत. त्यामुळे रसभंग होतो. प्रस्तावनेत हा पुरावा देऊन खुलासा करता येईल. पुराव्याने मुद्दा सिद्ध करणे आणि कादंबरी या दोन पातळ्या भिन्न आहेत. त्याची सरमिसळ नको.

तुम्हाला द्रौपदीचे, भीमाचे, भीष्म-कर्ण-कृष्णाचे मोठपण कळते. युधिष्ठिराला मात्र न्याय देणे जमत नाही. महाभारतातील पात्रांची निंदा करण, त्याना तुच्छ लेखणे, त्यांची चेष्टा करणे सोप आहे. तसे तर कृष्णाला जार, व्यभिचारी, धोकेबाज, खोटारडा असेही म्हणता येईल. पण एकेका पात्राचा मोठेपणा उलगडून दाखविणे मात्र कठीण आहे. तुमच्याच युगात सरदार पटेलांच्या सारखा माणूस गांधींची पत्नीपेक्षा जास्त मनोभावे सेवा करताना आणि महात्म्याच्या प्रत्येक लहरीला सर्वस्वाने पाठिंबा देताना तुम्ही पाहिला आहे. एवढी करारी आणि भव्य माणसे बाहुल्यांप्रमाणे नाचविण्याची ताकद ज्या हातात असते त्या हाताची शक्ती लहान नसते. भीम आणि अर्जुन द्यूतावर लावले जातात, हरतात आणि दास होतात पण त्यानी धर्मराजाचा स्वतःला जुव्यावर लावण्याचा हक्क नाकारला नाही. आणि द्रौपदीनेही प्रथम दास्यमुक्त केला तो धर्मराजच ! हा माणूस सामान्य नसला पाहिजे. मोठी माणसे कित्येकदा नालायकाप्रमाणे वागताना दिसतात. धर्मराज तसा दिसत असेल ! पण नालायकाना नालायकपणामुळे मोठंपण मिळत नसते. युधिष्ठिराच्या मोठेपणाचे केन्द्र कुठे आहे याचा आपण कधीतरी शोध घ्यावा. याला सम्राट करण्याचा कृष्णाला मोह का झाला ? हा केवळ वडील भाऊ असण्याचा भाग नाही. हे या घटनेचे सवंग स्पष्टीकरण झाले.

असो, पत्र फार लांबले. मुंबईला तुमच्या मित्रतेचा लाभ झाला म्हणून थोडे विस्ताराने लिहिले. राग मानू नय. क. लो. अ. हे. वि.

आपला नम्र

**नरहर कुरुंदकर**

(प्राध्यापक कुरुंदकर यांचे पत्र इथे संपले. कुरुंदकर हे विद्वत्तेची कामधेनू आहेत. त्यांच्या सहवासात पाच मिनिटेही आलेला मनुष्य ज्ञानधारेने तृप्त झाल्याशिवाय रहात नाही. त्यानी मला मित्र मानावे हे त्यांचे औदार्य आहे. माझे त्यांच्याशी नाते "शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्" असे आहे. त्यामुळे त्यांच्या पत्रातील विधानाबाबत कोणतेही प्रतिविधान मला करावयाचे नाही. फक्त त्यांच्या पत्रातील एक दोन मुद्याना अनुसरून थोडा खुलासा वाचकांसाठी करावयाचा आहे.

राधेला पान्हा फुटला या गोष्टीचा स्वीकार मी चमत्कार म्हणून केलेला नाही. जी पार्श्वपीठिका मी वर्णिली आहे तिचे परिणाम म्हणून असा पान्हा फुटणे ही शरीरशास्त्रीय शक्यता संभवते. हा संभव कोटि कोटि स्त्रियातून एक असा असला तरी तो असणे अशक्य नाही.

भारतीय वीरांच्या वयाचे कोडे हा प्रचंड प्रश्न आहे. कर्णाचे वय पंच्याहत्तर मानले तर धृतराष्ट्राचे शंभर, विचित्रवीर्याचे एकशेपंचवीस आणि भीष्माचे एकशे पन्नास असे वय येणार. हीही एक मोठीच आपत्ती. कारण भीष्म तरुणाप्रमाणे लढत आहे. बरे एकशे पन्नासाव्या वर्षी माणसे लढू शकत असतील तर तीच पंच्याहत्तराव्या वर्षी थोडाबहुत शृंगार करूही शकतील. हा प्रश्न फारच व्यापक आहे. हा कुणाला सुटलेला नाही व सुटेल असे वाटत नाही. माझ्या पुस्तकापुरता विचार करताना "सुनेला डोहाळे लागण्याचे दिवस" असे म्हणून मी कर्णाचे वय सुचविले आहे. माझे सर्व गणित इथे मांडणे अशक्य आहे. पण हे वय पन्नाशीच्या जवळ धरावे. वरील वाक्य वयाची सूचना देते तसाच शृंगारकाराना वाटणारा संकोचही सुचविते असे मला वाटते. त्या विशिष्ट मानसिक अवस्थेत आणि त्या वयात एकादी रात्र शृंगारात जाणे शक्य व्हावे.

मी केला असा महाभारताचा विचार करण्याचा माझा अधिकार कुरुंदकर मान्य करतात. त्यांच्या या म्हणण्यामुळे मला जो धीर आला आहे त्याचे मोजमाप फक्त माझा मी करू शकतो. माझ्या विचारामागे 'काळाची गरज' हीही एक प्रेरणा आहे. या प्रेरणेमुळे कलामूल्ये उणावण्याची भीती वाटून मी ती प्ररणा नाकारण अप्रामाणिकपणाच ठरेल. माझ्याच व्यक्तित्वाच्या चौकटीची जी बंधन माझ्यावर पडतात त्याच्यामुळे मला युधिष्ठिराचा मोठेपणा ही 'काळाची गरज' असे जाणवलेले नाही. ते जाणवण्याजोगा काळ आणि परिस्थिती सुदैवाने आली तर ते मला जाणवेलही. आणि तसे झाले तर मी युधिष्ठिराचीही स्तोत्रे अवश्य गाईन.

पत्र प्रकाशित करण्यास परवानगी दिल्याबद्दल मी प्राध्यापक कुरुंदकरांचा आणि ते करण्याची कल्पना मांडल्याबद्दल दीपावलीच्या संपादकांचा मी आभारी आहे. आनंद साधले.) ● ● ●

(महापुरुष : ले. : आनंद साधले ; प्रकाशक : सुनंदा प्रकाशन पृष्ठे २२५ ; मूल्य : आठ रुपय).











'सत्य हे कल्पितापेक्षाही चमत्कृतीपूर्ण, अद्भुत असते' असं आपण म्हणतो. त्याचा प्रत्यय देणारे एखादे जीवन जेव्हा 'सत्य' म्हणून समोर येते तेव्हा त्यातल्या अनुभवांना कादंबरीतल्या कल्पितापेक्षाही रंजक रमणीय रूप प्राप्त होते. हॉलीवूडच्या एका विख्यात चित्रतारकेच्या दिवाळी अंकापासून सुरू झालेल्या विलक्षण आणि चित्तथरारक आत्मकथेचा दुसरा भाग . . . .



## जिणे न माझे कांचनवाणे

—प्रभाकर अत्रे

### असा पहिलाच पुरुष

मला निद्रानाशाचा रोग जडला. रात्ररात्र डोळ्याला डोळा लागत नसे. खूप वेगवेगळी स्वप्नं पडत. कधी वासनेची तर कधी भीतीची. मी एका मानसरोग चिकित्सकाकडे गेले. त्याचे खरे नाव काही का असेना आपण त्याला डॉ. सेसान म्हणूया. त्याच्याकडे गेले की मीच आपली बोलत राहायची. तो काहीतरी लिहीत रहायचा. मग त्याने काही लाल हिरव्या गोळ्या दिल्या. काही पांढऱ्या तर काही संमिश्र रंगाच्या! पण त्यातली प्रत्येक गोळी वेगवेगळ्या प्रकारची स्वप्ने घेऊनच जणु माझ्याकडे येत असे. डॉ. सेसानला मी त्याबद्दल सांगितलं तर तो नुसता हसला. ग्रेगरी पेकजवळ मी हे सहज बोलले तेव्हा त्याने त्याची नोंद घेतली का? कुणास ठाऊक!!

प्रथम प्रथम त्याला (डॉक्टर) कुतुहल होते. मी श्रीमंत होते, सुस्थित होते तरीही त्याच्याकडे गेले की त्याला म्हणायचे "डॉक्टर, मला काही गलिच्छ—मळकट असे शर्ट द्या ना आणून? धुवीन म्हणते."

मला ही शाळेपासूनच सवय जडली होती खरी! प्रथम प्रथम त्याला त्यात लैंगिक विकृतीचा भाग वाटला. मग सहवासाने त्याच्या लक्षात आले की गोल्फ खळण्यात त्याला जो रस आहे तोच मलाही असले मळके कपडे धुण्यात आहे!

### ही सवय जडली कधी?

आणि मग प्रत्येक वेळी मागे मागे जाता जाता शोध लागला—सवय जडली तेव्हा मी फक्त आठ वर्षांची होते. डॉक्टरने त्याबद्दल बरीच चिकित्सा मांडली. ती तर्कसंगतही वाटली. पण खरी नव्हती. मळके शर्ट धुण्याची व त्यावर पडलेले लालसर डाग धुवून काढण्याची माझी सवय अजूनही कायम आहे. मला शय्यासोबत देणाऱ्या पुरुषाचीही सेवा मी हौसेने करते. मला ही सवय कशी जडली असावी याविषयी आम्ही मागे मागे जात असताना मला एक गोष्ट आठवली. त्यावेळी मी एका 'रोलर कोस्टर'वर एका मुलाबरोबर बसले होते. त्याचं नाव आता मला आठवत नाही. तो त्या रोलरवर धैर्याने उभा होता आणि आम्ही खाली खाली सरकत होतो. मला वाटायचे हा मुलगा जखमी होणार. मी त्याच्या शर्टाला ओढून त्याला त्याच्या जागी बसवण्याचा प्रयत्न करीत होते. त्याचा शर्ट पॅण्टच्या बाहेर आला तेव्हा मला त्याच्या शर्टावर प्रथमच एक लालसर, गंजाच्या रंगाचा डाग दिसला. प्रयत्न करूनही धुवला न गेलेला तो रक्ताचा डाग







अनुक्रमणिका

असल्यासारखे मला वाटले. 'मी तुझा हा शर्ट धुवून हा डाग काढून टाकू का?' मी त्याला विचारले. मी जणु लहानशी 'लेडी मॅक्बेथ' असल्यासारखेच मला वाटले. माझ्या त्या विचारण्यात त्याला फार जवळीक वाटली आणि त्याने हिरवळीवर नेऊन त्याला शय्यासोबत द्यावी अशी इच्छा व्यक्त केली. मला तो फारसा आवडला नव्हता. म्हणून मी त्याला पुन्हा कधी भेटले नाही. पण 'तसल्या' शर्टाचा माझा शोध मात्र चालूच राहिला.

डॉक्टर निरनिराळ्या चिकित्सा मांडीत होते. काही गोळ्याही देत होते. पण माझे दुखणे हटत नव्हते. झोप येत नव्हतीच. एक दिवस डॉक्टर मला म्हणाले, "मी आजवर उपचार केलेल्या रुग्णांपेक्षा तू वेगळी आहेस. तुझ्यातली खरी बार्बारा कोणती? मला ती अजून गवसली नाही. गवसेल की नाही सांगता येत नाही. मला तर वाटतं की तुलासुद्धा कदाचित ती गवसणार नाही. एखाद्या दुसऱ्या डॉक्टर-कडे जा आणि औषध घेऊन पहा".

त्या काळात मी चलाख होते. मला माणसांची मने जाणता येत होती. तो माझ्या प्रेमात पडला होता. खरं म्हणजे तो हुषार डॉक्टर होता व चांगला पुरुष होता. पण मी त्याची पेशंट असताना त्याला 'शृंगार' साधणार नव्हता. म्हणून त्याने मला तो सल्ला दिला होता.

माझा अंदाज बरोबर होता. त्याचे नाव **जोनाथन** असे होते. त्याच्या दवाखान्यात मी जात असे. तासन् तास आम्ही माझ्या प्रकृतीसंबंधीच बोलत बसत असू. पण त्याने कधीही आपल्या मनातली ती नाजुक भावना व्यक्त केली नाही की कधी स्पर्शाची मागणीही केली नाही. एकदा मलाच राहवेना. मीच त्याला स्पष्टपणे विचारले 'इतके दिवस मी येते आहे. पण तू माझे कधीच चुंबन घेतले नाहीस किंवा एखाद्या वीक एंडला माझ्याबरोबर यतस का असंही विचारलं नाहीस!'

"मी विवाहित आहे" तो म्हणाला.

तो विवाहित आहे हे मला ठाऊक होते. पण मला आवडलेला एखादा पुरुष केवळ विवाहित आहे ह्या कारणासाठी त्याची शय्या-सोबत नाकारायची ही कल्पना मी कधीच डोक्यातून काढून टाकली होती. आम्ही सहवास सुखाचा आनंद लुटला. सहवासाचा आनंद घेत असताना पुरुष नेहमीच वरं बोलत असतात. पण ते सारं खरं असतंच असं नाही. हा डॉक्टर प्रामाणिक होता, उत्कट स्वभावाचा होता. तो म्हणाला, "प्रत्येक स्त्रीला जगात जे ज म्हणून हवं असतं ते ते सारं तुझ्या पायाशी लोळण घेतं आहे. प्रीती, चाहते, यश, प्रयोग व त्यातून लाभणारी निर्मितीची तृप्ती, पुरुष सहवास—सारं काही तुझ्या पायाशी चालत आलं आहे. आणि तरीही तू तृप्त नाहीस. तुझ्या मनात खोलवर कुठतरी मूल्यांचा गोंधळ चालू आहे. वेग-वेगळ्या मूल्यांचे व त्या मूल्यसाधनेतून लाभणाऱ्या तृप्तीचे तुला आकर्षण आहे. तुला पुरुष हवा आहे पण असा पुरुष की जो आज अस्तित्वातच नाही. तुला समर्थ माणूस हवा आहे.—पण तू पेलू शकशील असा पुरुष हवा आहे. देखणा पुरुष हवा आहे, पण ज्याच्या देखणपणाचा दुसऱ्या कोणत्याही स्त्रीला मोह पडणार नाही असा हवा आहे. श्रीमंत पुरुष हवा आहे, पण जो तुझ्याबरोबर त्याविषयीची आसक्ती संपलेल्या माणसासारखा राहील असा हवा आहे. हुशार पुरुष हवा आहे. पण, पण तुझ्या कीर्ती वैभवावर मात करणार नाही असा हवा आहे. चलाख पुरुष हवा आहे. पण त्याला तुझ्या विविध भावस्थिती जाणून घेऊन तसं तसं वागता येईल असा हवा आहे. आणि असा पुरुष मिळत नाही हीच तर मुळात सारी अडचण आहे.

"तू आज एक मोठी चित्रतारका आहेस. पण तुला कधी काळी मोठी चित्रतारका व्हायचं होतं असं मला वाटत नाही. तुझ्या मनात एक खूप मोठी पोकळी निर्माण झालेली आहे. आणि तोच फार चांगला भाग आहे. सदसद्विवेक बुद्धी, उदारता, विनोदबुद्धी आणि इमान ह्या गोष्टींमुळे यशाचा मद व साज तुला कधी चढू शकणार नाही. वास्तविक तारका आणि तिची अखंड स्तुती ह्या गोष्टी कधी विलग होऊन चालत नाहीत. पण त्या स्तुतीतील खोटेपणाची वा उथळपणाची तुला तीव्र जाणीव आहे. आणि हेच अनिष्ट, धोका-दायक आहे. जे आपल्याला साधायचे आहे आणि ज्यासाठी तुम्ही प्रयत्नशील आहात त्या मूल्यांनाच तुम्ही कमी लेखून हसलात की, सारं काही खलास! चित्रतारका म्हणून काही साधायचं असेल तर त्या व्यवसायातील उणीवा ध्यानी घेऊनसुद्धा त्या व्यवसायावर नितांत श्रद्धा हवी".

जोनाथन बरोबर सांगत होता. त्याचे बोलणे संपल्यावर मी त्याचे चुंबन घेतले—त्या बोलण्याच्या पसंतीची पावती होती ती!

त्यानंतर त्याने मला दुसऱ्या एका डॉक्टरकडे जायला सांगितले. जोनाथन मला भेटणार नव्हता—मी त्याला भेटणार नव्हते—

**असं मला वाटलं......**

पण एक दिवस त्याचे मला जेवणाचे आमंत्रण आले. सागरतीरी बसलेल्या एका जॅक ॲट द बीच् ह्या हॉटेलात आम्ही एकमेकांना भेटलो. जेवण—कॉफीपान झाल्यावर जोनाथन, टेबलावर टेकलेला माझा हात हाती घेत म्हणाला—"माझं तुझ्यावर प्रेम आहे" माझा हात हाती घणं हेसुद्धा त्याच्या दृष्टीने फार मोठं धाडस होतं.

"माझं लग्न झालं आहे. वैवाहिक जीवनही सुखाचं, तृप्तीचं आहे. मला दोन मुलं आहेत. प्रतारणा करणाऱ्या पुरुषांपैकी मी नाही—मी घटस्फोट घेऊन तुझ्याशी लग्न तरी करीन. नाहीतर त्या प्रीतीवर मात करण्याचा तरी प्रयत्न करीन. ते मला साधेल की नाही ठाऊक नाही."

मला हे नवीन नव्हतं. अनेक पुरुषांनी मजबद्दलची आपली प्रीती व्यक्त केली होती. हे मी अहंपणाने म्हणत नाही. फक्त वस्तु-स्थिती सांगते आहे. ह्यावद्दलचे उपायही मला ठाऊक होते. गरज पडली तेव्हा मी ते वापरलेही होते.

मी त्याला म्हणाले, "तुला ठाऊक आहे की माझ्या व्यक्तित्वात अनेक बार्बारांचं मिश्रण झालं आहे. तुझं प्रेम नेमक्या कोणत्या बार्बारावर आहे ?"










# ओगले*
# बरणींत
# पदार्थ
# नक्कीच
# आकर्षक
# दिसतो




मुंबई, कुलावा व ठाणें जिल्ह्यांकरतां,
अधिकृत वितरक:




**डब्ल्यु. आर. तळवलकर ब्रदर्स प्रा. लि.**

छॅटिन चेंबर्स, दलाल स्ट्रीट, मुंबई १ फोन २९०५०६

अनुक्रमणिका

"त्यातल्या सर्व जणींवर"

असल्या समस्यांवर माझे मार्ग काहीसे विचित्र वाटणारे असत. पण त्यांचा फार उपयोग होत असे. मी त्याला झटकन् म्हणाले, "म्हणजे तुला माझी शय्यासोबत हवीय् असंच की नाही ?"

"ते तर खरंच. पण खरंच सांगतो बार्बारा, माझं तुझ्यावर फार फार प्रेम आहे. मला प्रतारणा करता येत नाही"

"तुला फक्त तात्विक विचार करता येतो. मला वस्तुस्थितीचा विचार करता येतो. माझं आयुष्यच तसं गेलंय्. ठीक आहे. तुझं माझ्यावर प्रेम आहे. माझा त्यावर विश्वास आहे. पण खरं सांगू ? तुला माझं शरीर हवंय् ! त्या एका वासनेने तू पेटला आहेस. मला तू आवडतोस म्हणून तुझ्या ह्या इच्छेला एकदा प्रतिसाद द्यायचं मी ठरवलं आहे. तुझं घर – तुझा संसार आणि कदाचित तुझं सारं आयुष्य उध्वस्त करून टाकण्यापेक्षा ते बरं, नाही का ?"

तो गप्प बसला. त्याच्या व्यथा जणु माझ्याशी उत्कटतेने बोलत होत्या.

"ठीक आहे. आपण निघू या. हॉलिडे हाऊसवर जाऊ या. दोन वेगवेगळ्या – पण शेजार – शेजारच्या खोल्या घेऊ. तीन तास राहू. त्या तीन तासात तुला उत्कटतेनं वाटलं की मी तुला हवी आहे, तर तू ये. मी वाट पाहीन"

आम्ही हॉलिडे हाऊसमध्ये गेलो. ठरल्याप्रमाणे राहिलो. एक तासाने त्याने दार वाजवले. मी दार उघडले. "तो भावविवशतेने म्हणाला "मला चुंबन हवंय् बार्बारा" मी त्याला चुंबन दिले. तो म्हणाला "मी घरी जातो. मला ते जमलं नाही. पटलं नाही. मी गणितीबुद्धीचा चिकित्सक माणूस. मला ते साधलं नाही पण मी तुला कधी विसरणार नाही. तू सतत माझ्या मनात राहशील"

त्याची अगतिकता, व्यथा मात्र दिसत होती. जाणवत होती. पण माझा इलाज नव्हता. माझा सल्ला त्याला मान्य नव्हता.

परतीच्या प्रवासात तो फक्त एकच वाक्य बोलला "येवढा धुंद, सुखद अनुभव नाकारणारा मी कदाचित पहिलाच पुरुष असेन."

मी हसले. मला त्याच्याबद्दल आदर होता. मला तो आवडत होता.

त्याने आपल्यावर विजय मिळविला. कारण त्यानंतर वर्षानुवर्षे फक्त त्याची ख्रिस्तमस कार्डेच माझ्या भेटीला येत राहिली. आजही येतात. त्यावर 'धन्यवाद' येवढेच शब्द असतात. अजूनही त्याच्या सहवासातले मजेशीर प्रसंग मला आठवतात.

डॉ. बंटनेही माझ्या लहानपणाच्या अनेकविध आठवणी काढायला लावल्या. खोदून खोदून विचारले. त्या उफाळून वर आल्या.

त्यातून माझ्या वडिलांच्याही आठवणी निघाल्या. मी वयात आले. सारे स्त्रीत्व जणु माझ्यात मोहरून आले होते. ते पाहून माझे वडील घाबरले. माझे काय करावं, मला कसं सांभाळावं या कल्पनने ते गोंधळले. आणि त्यातून ते बेपर्वा बनत गेले. जणु काही दायित्व त्यांच्यावर नव्हतेच. मी बाहेर हिंडते, फिरते हे त्यांना ठाऊक होतं. तरीही ते तटस्थ होते. डॉ. बंट म्हणाले "चांगलं-वाईट काय याचा निर्णय मनाशी करता आला नाही की माणसं गोंधळतात. तटस्थ बनतात. पुष्कळ जणांच्या बाबतीत हे घडतं."

"यात फक्त एकच धोका असतो. बाप असा तटस्थ बनत गेला की, मुलगी बाहेर कुठे तरी बापाच्या शोधात फिरू लागते आणि त्या बापात ती प्रियकराचेही रूप मग पाहू लागते"

त्याच्या त्या वाक्याने माझी एक अतिशय घाणेरडी, लज्जास्पद आठवण जागी झाली. माझ्या एका मैत्रिणीच्या वडिलांवर मी प्रेम करू लागले होते तो प्रसंग मला आठवला. मी त्यावेळी पंधरा वर्षांची होते – तो देखणा होता. आर्किटेक्ट होता. पंचचाळीसचा असावा. एका वाढदिवसाच्या पार्टीला मी तिच्या घरी गेले होते. माणसे मजेत खात पीत होती. मी पायऱ्या चढून वर गेले. जॉन (त्याचे नाव) च्या खोलीत कुणीतरी होते म्हणून थांबले. तो गेल्यावर मी आत गेले. त्याने मला ओढले. चुंबन घेतले. येवढ्या माणसात कुणी पाहणार तर नाही ? ह्या कल्पनने मी हादरून गेले होते.

नंतर जे घडले ते सारे सांगता येण्यासारखे नाही. घडायचे ते घडून गेले येवढंच!

पण त्यानंतर ते संपलं नाही. कित्येक दिवसपर्यंत जॉन माझ्या शाळेपाशी रोज थांबू लागला. मी त्याला खूप सांगून पाहिलं की, त्या थांबण्यात काही अर्थ नाही. माझं तुझ्यावर प्रेम नाही. शाळेतल्या एका मुलावर ते आहे. हवं तर मी तुझ्या घरी कधी कधी येणार नाही. हवं तर गावही सोडीन"

तो घटस्फोट घ्यायला निघाला होता.

परत घरी फिरला.

पण माझी मैत्रिण मात्र म्हणत होती "फुटली काच सांधता येत नाही. उध्वस्त संसार पुन्हा पूर्वीच्या उत्कटतेने मांडता येत नाही"

[ क्रमशः ]














# दारूबंदी अधिक शिथील होणार नाही

**—ना. भानुशंकर याज्ञिक**

**महाराष्ट्रात नुक्ताच दारूबंदी प्रचार पंधरवडा साजरा करण्यात आला. त्यानिमित्त महाराष्ट्र राज्याचे दारूबंदी मंत्री श्री. भानुशंकर याज्ञिक यांची आमच्या प्रतिनिधीने घेतलेली खास मुलाखत :**

"दारूबंदी अधिक शिथिल होणार नाही, अजिबात रद्द तर होणार नाहीच नाही" असे स्पष्ट उद्गार महाराष्ट्र राज्याचे दारूबंदी मंत्री श्री. भानुशंकर याज्ञिक यांनी दारूबंदी पंधरवड्यानिमित्त 'दीपावली'साठी खास मुलाखत देताना काढले.

श्री. याज्ञिक यांच्या 'देवगिरी'वरील निवासस्थानी मी पोहोचलो तेव्हा त्यांची प्रकृती ठीक नसल्याचे समजले; पण मुलाखतीसाठी आधीं वेळ ठरविली असल्याने ते तशाही स्थितीत दिवाणखान्यात येऊन बसले आणि मान्य केल्याप्रमाणे त्यांनी मुलाखतही दिली.

प्रारंभी श्री. भानुशंकरभाई याज्ञिक यांना मी माझा परिचय करून दिला आणि माझ्या भेटीचा उद्देश त्यांना सांगितला. नंतर त्यांनी प्रश्न विचारण्यास संमती दिल्यावर 'सरकारने दारूबंदी कायद्यात सुधारणा करून साडे तीन टक्के मद्यार्क घेण्यास परवानगी दिली आहे, त्यामुळे 'दारूबंदी'च्या धोरणावर विपरीत परिणाम झाला आहे अशी टीका ऐकू येते, त्याबद्दल आपले काय म्हणणे आहे?' असे मी विचारले.

या माझ्या पहिल्याच प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले, "दारूबंदी कायद्यात सुधारणा करून पाच टक्केपर्यंत (तुम्ही म्हणता त्याप्रमाणे साडेतीन टक्के नव्हे) मद्यार्क-प्राशनास महाराष्ट्र शासनाने परवानगी दिली आहे. शासनाच्या या धोरणामुळे दारूबंदीच्या परिस्थितीवर विपरीत परिणाम झाला असे म्हणणे योग्य ठरणार नाही. दारूबंदी मर्यादित प्रमाणात शिथिल केल्यामुळे हातभट्टीच्या धंद्यावर विपरीत परिणाम झाला आहे असे निश्चितपणे म्हणता येईल. कारण आता ताडीची दुकाने उघडल्यामुळे ताडीची आवड असलेले नशाबाज लोक हातभट्टीच्या विषाकडे वळेनासे झाले आहेत."

## माणसाची सहज प्रवृत्ती

आपल्या या उत्तरावरून आपल्या राज्यात बेकायदा हातभट्टया चालू असतात हे मान्य केल्यासारखे दिसत नाही का? असे विचारताच ते म्हणाले, "हातभट्टया चालू असतात ही वस्तुस्थिती आहे. ती अमान्य करून नाहीशी होणार नाही, तर त्याविरुद्ध जोरदार प्रचार केला पाहिजे आणि सरकार निरनिराळ्या मार्गाने तो करीतही असते. जनतेचे संपूर्ण सहकार्य मिळाले तर दारूबंदीचे धोरण शंभर टक्के यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाही. तुमच्या प्रश्नाचे हे सरळ उत्तर आहे; पण तुमच्या प्रश्नात जी खोच आहे तिलाही मी उत्तर देऊन टाकतो. दारूबंदी आल्याबरोबर बेकायदा हातभट्टयांमध्ये वाढ झाली, याचे कारण म्हणजे नियंत्रणे आली की त्यातून पळवाटा काढणे आणि शक्य तर नियंत्रणे धाब्यावर बसवणे हा मानवी स्वभाव आहे. त्याला अनुसरूनच या गोष्टी घडत असतात. आपल्याकडे दारूबंदी नव्हती तेव्हा आणि इतर काही राज्यातून आता दारूबंदी नाही तरीही बेकायदा हातभट्टया होत्याच आणि आहेतही. रेशनिंगचेच उदाहरण पहा ना! अन्नधान्यावर नियंत्रणे आल्याबरोबर काळाबाजार सुरू होतो. ही मानवी प्रवृत्तीच आहे. तेव्हा बेकायदा दारूभट्टयांमध्ये थोडी वाढ झाली यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. अशा बेकायदा दारूभट्टया बंद करण्याचा उपाय म्हणजे जनतेत जागृती निर्माण करून 'दारू हे विष आहे' असे लोकांच्या मनावर ठसवणे, हाच होय.

'दारूबंदीच्या धोरणामुळे पोलिस खात्यात लाचलुचपतीचे प्रमाण वाढले आहे असे म्हटले जाते त्यात कितपत तथ्य आहे?' या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले, "या प्रश्नाचे सविस्तर उत्तर मी आत्ताच दिले आहे. दारूबंदीमुळेच लाचलुचपतीला वाव मिळतो हे म्हणणे बरोबर नाही."

'रशियासारख्या देशातही मद्यपानाविरुद्ध जोरदार प्रचार करण्यात येतो असे म्हणतात. दारू प्यायचीच झाली तर ती सरकारच्या अधिकृत भट्टीत तयार झालेलीच घ्या आणि तीही माफक प्रमाणात घ्या यावरही तिकडे भर देण्यात येतो. आपल्याकडेही

अनुक्रमणिका

तशाच धर्तीचा प्रचार कां होऊ नये ?' या माझ्या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले,

"शासनाने दारूबंदी-प्रचार मोठ्या प्रमाणावर व्हावा अशी योजना केलेली आहे. प्रत्येक जिल्ह्यात एक दारूबंदी प्रचार अधिकारी (प्रोहिबिशन प्रोपॅगण्डा ऑफिसर) नेमलेला आहे आणि याशिवाय चारही विभागात विभागीय अधिकारी नेमलेले आहेत. खेड्यापाड्यात जाऊन आणि जनतेत मिसळून त्यांनी दारूबंदीचा प्रचार करावयाचा असतो. शिवाय सध्या चालू असलेल्या दारूबंदी पंधरवड्यासारखे कार्यक्रम आखून त्याद्वारेही प्रचाराचे काम चालू असते."

## भारताची थोर परंपरा

'देशातील इतर राज्यांच्या मानाने महाराष्ट्रात दारूचा–विशेषत: बेकायदा दारूचा–खप अधिक होतो हा आरोप खरा आहे का ?' असा प्रश्न नंतर मी त्यांना विचारला तेव्हां श्री. भानुशंकरभाई याज्ञिक म्हणाले,

"इतर राज्यांच्या मानाने महाराष्ट्रात मद्यपानाचे प्रमाण अधिक आहे असे म्हणता येणार नाही. उलट महाराष्ट्र-गुजरात राजस्थान-म्हैसूर या राज्यातून दारूच्या थेंबालाही स्पर्श न करण्याची वर्षानुवर्षाची परंपरा आहे. आणि ती परंपरा अव्याहत चालू ठेवणारी कित्येक कुटुंबे आहेत. मद्याला स्पर्श करणे म्हणजे पातक आहे असेही ते मानतात. इतर राज्यांमधूनही अशी श्रद्धा असणारे लोक आहेतच; पण आपल्या राज्यात त्यांचे प्रमाण अधिक आहे असे मला ठामपणे म्हणावयाचे आहे."

यानंतर मी त्यांना विचारले की 'मद्यपान, जुगार खेळणे या प्रवृत्ती माणसाच्या अंगी उपजतच असतात. अनादि कालापासून त्या चालत आलेल्या आहेत. तेव्हा त्या प्रवृत्ती बाह्य उपायांनी दडपता येणे शक्य आहे काय ?' माझा प्रश्न ऐकून ते किंचित स्मित करीत म्हणाले, "मी मघा वर्णन केलेल्या थोर परंपरा घराण्या घराण्यातून चालू आहेत त्या भारतामध्ये विवेकबुद्धी जागृत असल्याचेच दर्शवितात. तसे नसते तर तुम्ही उल्लेख केलेल्या अनादि कालापासूनच्या मद्य-सेवनाच्या प्रथेचे रूपांतर भयानक व्यसनात केव्हाच झाले असते आणि देशात मद्याचे समुद्रच उसळले असते; पण तसे झाले नाही याचे कारण ही विवेकबुद्धीच होय. या विवेकबुद्धीलाच महात्मा गांधींनी आवाहन करून आपल्या मनावर ताबा ठेवण्याचा (Self–Control) प्रचार केला. आताच्या दारूबंदीच्या प्रचारातही तेच धोरण आहे. जनतेच्या सत्प्रवृत्तींना आवाहन करून त्यांच्यातील दुष्ट विचारांना बाहेर काढून लावावे हाच अशा प्रचाराचा हेतू असतो."

## आता अधिक सवलती नाहीत

'यापुढे दारूबंदी अधिकाधिक शिथिल करण्याचे धोरण सरकार अंमलात आणील काय ?' असा प्रश्न मी भीतभीतच विचारला तेव्हा ते करारी मुद्रेने म्हणाले,

"महाराष्ट्र शासनाने दारूबंदी थोडीशी शिथिल करून पाच टक्क्यांपर्यंत मद्यार्क सेवनाला मुभा दिली यावरून यापुढेही दारूबंदी अधिकाधिक शिथिल होत जाईल हे खरे नाही. सध्याची माफक प्रमाणात दिलेली मुभा रद्द करण्याचाही तूर्त विचार नाही," असे त्यांनी शेवटी ठामपणे सांगितले.

"महाराष्ट्राचे मुख्यमंत्री वसंतराव नाईक यांच्या म्हणण्याप्रमाणे दारूबंदी अमलात असल्यानेच लोक घाणेरडी-विषारी दारू पितात; त्याला आळा घालावा म्हणून शासनाने पाच टक्क्याची परवानगी दिली आहे. म्हणजे एका विषावर उतारा म्हणून दुसरे विष देण्याचाच हा प्रकार आहे असे नाही का वाटत ?" असा प्रश्न माझ्या मनात घोळत होता; पण एक तर मुलाखतीची वेळ संपली होती आणि दुसरे म्हणजे त्यांची प्रकृतीही ठीक नव्हती म्हणून–

प्रकृति ठीक नसताही त्यांनी मुलाखत दिली यावद्दल त्यांचे आभार मानून मी त्यांचा निरोप घेतला.

●●●

---

(पान ५६ वरून–**जखम**)

मिळेला होस्टेलमधल्या आपल्या खोलीतला बिछाना आठवत होता. त्यावरचे उबदार, सोलापुरी पांघरूण तिला आत्ता आपल्या अंगाभोवती लपेटून घ्यावेसे वाटत होते... एखाद्या अज्ञात पण लंपट बाहुपाशासारखे...

वसंतरावांना नेहमीप्रमाणे डुलकी येऊ लागली होती. हळूच उठून खाली जावे अन् आणखी एक दुधाचा कप मिळतो का पाहावे असे त्यांना वाटत होते. पण श्रोतृवृंदात ते फार पुढे बसले होते, अन् मध्येच उठून जाणे काही ठीक दिसणार नव्हते.

वसंतराव डोळे चोळीत जागे राहण्याचा प्रयत्न करू लागले. पण आता हवेतला गारवाही वाढला होता. वाऱ्याची झुळूक येत होती. घरी जाऊन झोपावे असे वसंतरावांना वाटत होते! दुकानात उद्याच्या बाटचाला ढीगभर काम होते... सेलची तयारी करायची होती !...

उमा-निमा कौतुकाने गाणे ऐकत होत्या. गाणे शिकवा असा त्या आप्पासाहेबांकडे हट्ट धरून बसणार होत्या. आक्कानी सांगितले तर आप्पा ऐकतील ! अभ्यास आधी बघा असे म्हणणार नाहीत !

आकाशातला चंद्र दूरदूर जाता जाता आता लहान झाल्यासारखा वाटत होता. ही कोवागिरी आठवणार नव्हती ती फक्त त्यालाच. त्याच्या अंगावर अनेक युगांच्या जुन्या जखमांचे वण होते.

फक्त अशा एखाद्या रात्री त्या जखमांची खपली काढली जाई, अन् पृथ्वीवरले वेडे लोक त्यातून भळभळा वाहणाऱ्या रक्ताला चांदणे समजत !

●●●

## (पुन्हा एकदा) सिनेमाचे नाटक

रुपेरी पडद्यावर 'ब्रम्हचारी' गाजला. त्याने मराठी चित्रसृष्टीत धमाल उडवून दिली. अजूनही माणसे त्या 'चित्रपटा'च्या दुनियेत सैर करून येतात इतकी त्या चित्रपटाची स्मृति सतेज व चिरंतन वाटावी अशी आहे. म्हणूनच आचार्य अत्रे यांना तो 'ब्रम्हचारी' रंगमंचावर आणण्याचा मोह झाला असावा. आता 'चोरावर मोर' हा चित्रपट 'अशी बायको हवी' ह्या नावाने रंगमंचावर आला आहे. कादंबऱ्यांची नाटके, कथांची नाटके, जुन्या नाटकांची नवी नाटके (चमकला ध्रुवाचा तारा) आणि चित्रपटांची नाटके असा हा प्रवास सूर्त जोरात चालू आहे. 'अत्रे थिएटर्स'च्या वतीने हे नाटक रंगमंचावर आले. दैवयोग येवढाच (आणि वाईट) की आज आचार्य अत्रे हयात नाहीत. ह्या नाटकाचा 'पहिला प्रयोग' व्हायच्या आतच त्यांच्या 'धमाल'-जीवन नाटकाचा अखेरचा प्रयोग होऊन गेला. हे नाटक पहात असताना आचार्यांचे स्मरण सतत व अपरिहार्यपणे होत होते. म्हणून हा उल्लेख जाणीवपूर्वक केला आहे.

आचार्य अत्रे यांनी लिहिलेले कुशल व खुसखुशित संवाद, आत्माराम भेंडे यांचे कसबी दिग्दर्शन व पात्रांचा मनमोकळा व सहजसुन्दर अभिनय यामुळे प्रेक्षक तीन तास मनमुराद रंगतो. हसत राहतो. डोक्याला ताप नाही. संदेशाचा वा बोधाचा शीण नाही. नाटकातील प्रसंगाची गुंफण मोठी छान केली आहे. पाकळीतून पाकळी फुलत जावी तसे प्रसंगातून प्रसंग चढत जातात. प्रेक्षकांना ते बरोबर घेऊन जातात.

नाटकाचा प्रारंभच मोठा सुन्दर साधला आहे. एक एंजीन व चार डबे असलेली एक प्रतीकात्मक गाडी रंगमंचावर चालत (अक्षरशः चालत हं) येते. ती आल्याबरोबर हशा पिकतो. माणसे खूप होतात. सावरून बसतात. 'चोरगाव स्पेशल' हे नाव वाचूनही मजा वाटते. तेवढ्यात गाडीतला 'रघू' स्टेशनात उतरतो. गाडी रंगमंचावर येते तेव्हा 'अशी बायको हवी' हे पार्श्वगीत चालू असते. त्या चार डब्यात ह्या नाटकातली चार महत्त्वाची पात्रे रंगमंचावर एका अभिनव पद्धतीने 'इंट्रोड्यूस' होतात. गाडी हलते. आणि 'चोरगाव'चे हमाल आपल्या गावाचे नाव सार्थ करतात. राहिलेल्या एका चपलेचा व पिशवीचा भार एक 'बोगस' दिवाणजी येऊन हलका करतो. नेसत्या कपडयांनिशी तो काकाकडे जायला निघतो. पण वाटेत एका हवेलीत त्याला एक मुलगी दिसते. दोघांची दृष्टभेट होते. दोघे प्रेमात पडतात. त्याच्या काकानेच त्या मुलीला सांभाळलेले असते. तिच्याशी लग्न करण्याची त्यांची इच्छा असते. रघुला हे काही ठाऊक नसते. तो काकाकडे येतो. आपली 'दुहेरी हालत' त्यांना सांगतो (कपडे सामान गेल्याची व प्रेमात पडल्याची) ती सांगितल्यावर ते त्याला सावध करण्याचा व ह्या भानगडीत न पडण्याचा उपदेश करतात. तिला अडकवून ठेवणारा म्हातारा म्हणजे आपला काकाच हे रघूला ठाऊक नसल्याने रघू त्या 'थेरडया'ला भरपूर शिव्या देतो. त्याची निंदा करतो. आणि काकाला ती ऐकून घ्यावी लागते (व वर पैसे द्यावे लागतात) काकाचा विरोध रघू-जानकीच्या प्रेमाची उत्कटता,



त्यासाठी त्याला सहाय्यभूत होणारी शिवा-हौशीची जोडी, त्यासाठी होणारे काकाचे द्रव्यसहाय्य आणि काकांची तगमग-तडफड, जानकीचा भाबडेपणा, अशिक्षितता ह्या अनेक गोष्टींमुळे ह्या नाटकातले प्रसंग कुठे तसे 'गतिशून्य' होत नाहीत. दिग्दर्शकानेही ते तसे कुठेही होऊ दिले नाहीत. प्रथमच वापरलेल्या गाडीच्या गतीने नाटक हलत, बोलत व हसवीत राहते. त्याच्या 'फार्सिकल ट्रीटमेंट'मुळे ते सजीवही बनते. पण रघू आणि काका, काका आणि जानकी ही पात्रे आमने-सामने न आणता गोंधळ वाढता ठेवणाऱ्या कसबी प्रसंगांची निर्मिती आचार्य अत्रे यांनी केली आहे. आणि आपल्या कुशल व मोकळ्या अभिनयाने अण्णा (बाबा वैशंपायन) रघू (उदय गोडबोले) जानकी (मीना सुखटणकर) शिवा (दिनेश करमरकर) हौशी (ललिता कारेकर) हे कलाकार ते नाटक खेळते, पळते ठेवतात. अर्थातच मूळ नाटक मोलियर ह्या विख्यात विनोदकाराचे. अत्रे यांच्या प्रकृतीशी मिळते जुळते. त्यातून घडला सिनेमा–आता आले नाटक. पण ते कसेही आलेले असो–चार घटका हसवणूक ह्या दृष्टीने सह्य व रंगतदार!! नाटकातील गोडबोले हे एकमेव गायक नट. सारी गाणी त्यांनाच. ते गाण्यांना ते काय देतात. काही गाणी 'टाळचा' घेतात. श्रेय–दत्ता डावजेकर यांचे. मीना सुखटणकर यांची नृत्ये मात्र 'तमाशातली मुलगी' ह्या पार्श्वभूमीवर फारशी परिणामकारक होत नाहीत. तशी ती व्हायला हवीत. त्यांची 'भाबडी' जानकी मात्र त्यांनी अनेक बारकाव्यांनी फार सुरेख उभी केली. रंगतीचे श्रेय आत्माराम भेंडे यांचे. ह्या प्रहसनाला काही अंगभूत मर्यादा आणि अंगभूत सामर्थ्य लाभले आहे. त्यामुळे "टेक इट् लाइटली अ‍ॅण्ड एंजॉय्" येवढंच लिहिणं उचित वाटतं.

## एक 'स्फोटक' आणि 'प्रभावी' व्यंग्य

महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेत प्रतिवर्षी अनेक नवनवीन नाटके पेश केली जातात. त्यात प्रयोग, प्रयत्न असतात आणि त्यातून मराठी रंगमंचाला काही नवे पण समर्थ नाटककार लाभले आहेत. लाभत आहेत. हे प्रयोग प्रयत्न होत राहिलेच पाहिजेत. यंदाच्या नाट्य-स्पर्धेत काही नवीन नाटके आली. त्यातली काही 'राजकीय व्यंगे' होती (दंबद्वीपाचा मुकाबला–विजय तेंडुलकर) तर काही 'सामाजिक व्यंग्ये' होती. त्यातले एक तुफान स्फोटक 'सामाजिक व्यंग्य' **'ग्रँड रिडक्शन सेल'** या नावाने मुंबईच्या उदय कला केंद्राने स्पर्धेत सादर केले. नाटकाचे लेखक आहेत शं. ना. नवरे. ह्या नाटकाचा विषय, मांडणी–मांडणीतील नाविन्य, त्याची एक अन्वर्थक व बड्या-भल्यांची झोप उडवील अशी परिभाषा आणि त्या चित्रणाच्या द्वारे







लाभणारी दृष्टी (निदान लाभावी अशी नाटककाराची अपेक्षा) ह्या साऱ्याच गोष्टी मोठ्या स्फोटक, बोचऱ्या आणि अंतर्मुख करणाऱ्या अशा आहेत. 'सामाजिक' हे 'लेबल' तसे अनेक कादंबऱ्या-नाटकांना लावले जाते. पण नवऱ्यांचे हे नवे नाटक खऱ्याखुऱ्या अर्थाने 'समाजिक' नाटक आहे असे म्हणता येईल.

आजच्या जीवनाला एक प्रचंड गति लाभली आहे. आणि त्या गतिशील प्रवासात माणूस आपला चक्रावून फिरतो आहे. त्याचे माणुसपण, त्याच्या मनात त्याने जपलेली सारी मूल्ये, त्याच्या मनातली कोवळीक, उत्कट भावभावना, सत्य-प्रामाणिकता, त्यागादी संस्कार ह्या साऱ्याच चांगल्या मानल्या गेलेल्या गोष्टींना तो पारखा झाला आहे. त्याचे मूल्य आज पैसा आणि पैसा हेच बनले असून त्यासाठी प्रत्येक गोष्टीचा बाजार मांडला जात आहे. आणि असा भरकटत गेलेला, गती लाभलेला पण माणूसपणच हरवलेला माणूस नवरे यांनी आपल्या नाटकात अगदी उघड्या नागड्या, स्वच्छ आणि स्पष्ट (काहीसा 'ब्लंट'पणे) अशा स्वरूपात प्रेक्षकांपुढे सादर केला आहे. ह्या नाटकाचे सर्वात मोठे सामर्थ्य त्याच्या विषयात आणि आशयात आहे. ह्यात जणु एक खूप मोठा आरसा मांडून ठेवण्यात आला आहे. आणि आजच्या तुफान गतीने सरकणाऱ्या तुम्ही आम्ही त्या आरशात आपापली रूपे पहायची आहेत. डोक्यात व मनात काही प्रकाश पडला तर पाडून घ्यायचा आहे. समाजाचे हे विदारक चित्रण करायला केवळ भेदक दृष्टि हवी असे नाही. तर 'सहानुभूत' मनही हवे. 'उत्तम आणि अधमा'चा विवेकही हवा. आणि त्याहूनही पलिकडे पाहू शकणारे 'व्हिजन'ही हवे. नवरे यांनी ह्या नाटकामे ती झेप आपण घेऊ शकतो हे सिद्ध केले आहे. खंत तर साऱ्यांच्याच उरी असते. पण त्या हरवलेल्या माणसाचा व माणुसकीचा शोध शोधक कलाकारच घेऊ शकतो.

'आशय–विषया'बद्दल लेखकाचे 'देणे' देऊन टाकल्यानंतर त्याने हा विषय ज्या प्रयोगशील पद्धतीने मांडला आहे आणि तो मांडतांना त्याने जी गुंफण केली आहे (प्रवेशांची) त्याबद्दलही त्याचे अभिनंदन केले पाहिजे. एका प्रसंगातून दुसरा गुंफलेला आहे. आणि तरीही ह्या प्रसंगातून समाजाच्या विविध 'व्यंगां'वर अचुक बोट ठेवले आहे. त्या त्या प्रसंगांना ते ते परिमाण व अन्वर्थक परिभाषाही दिली आहे. ती देताना कलात्मक अलिप्तता राखली आहे. काही काव्य आहे. काही तत्त्वज्ञान आहे. आणि प्रत्येक प्रसंगात 'विवेकाची टोचणी' कुठेतरी सूक्ष्मपणे वावरताना दिसते आहे. अखेर संघर्ष आहे तो 'विवेक' आणि 'व्यापारी मनोवृत्ती'तलाच आहे आणि म्हणूनच त्याला व्यापक व सार्वकालिक स्वरूप लाभले आहे. पहिल्या प्रवेशात पत्नीने काया 'विक्रय करूनही' नोकरी करावी अशी अपेक्षा करणारा व 'विक्रय' हाच धर्म मानणारा पति आहे. दुसऱ्या प्रवेशात 'कायाविक्रया'ला लागलेल्या त्या सुन्दर, विवाहित स्टेनो (?) च्याच निमित्ताने एका कुटुंबातील 'धंदेवाईक' आई, बाप व भंकस मुलगा त्यांच्यातल्या स्फोटक व्यक्तित्वाचे दर्शन घडते. त्यातली परिभाषा आजची, बोलकी व पुरेशी 'ब्लंट' आहे. पत्नी, मुले याविषयीची 'बाजारी' परिभाषा पहिल्या दोन प्रवेशात कानी येते. तिसरा प्रवेश आजच्या महाविद्यालयीन सहलीला घेऊन जातो. अँग्री यंग मेन– उगीचता, विफलता, अश्रद्धा, मद्य, आणि लिम्मय संप्रदायाशी त्या पिढीचे असलेले नाते, हाणामारी, उगीच हवे असलेले थ्रिल आदि अनेक गोष्टींचे दर्शन घडते. तिथेही एक 'सोवळा' असतो. त्याच्या मुखाने काळाचा 'विवेक' आपली व्यथा-वेदना बोलत राहतो. त्यानंतरच्या प्रवेशात शैक्षणिक क्षेत्रात चाललेला 'पदवी'चा व्यापार चित्रित झालेला आहे. राजकीय क्षेत्रातली सौदेबाजी (आणि सौदेबाजीच) आपल्या साऱ्यांच्या चांगल्या परिचयाची आहे. त्या राजकीय सौदेबाजीत एका नाटककार-कवीची प्रतिभा कशी हरवून जाते–जे हरवले आहे त्याची जाण त्या कवीला होते आहे. पण "कायदा पाळा गतीचा। थांबला तो संपला' असे तिथेही घडताना दिसते. आणि अखेरीस "हा हरवलेला माणूस कुठे गवसेल का? पुन्हा सापडेल का?" असा विचार करीत माणसे घरी परतात. ह्या नाटकातले प्रवेश पाहताना एकीकडे माणसे हसतही होती. आणि त्या आरशातले आजच्या (तथाकथित) प्रगत समाजाचे चित्र-रूप पाहून अंतर्मुखही होत होती. ह्या नाटकात सुरुवातीला कालपुरुष वापरला गेलेला आहे. ती कल्पना तशी नवीन नसली तरी त्याच्या मुखातून काळाची वेदना बोलकी करण्यात लेखक यशस्वी झाला आहे. प्रत्यक्ष प्रयोगात मात्र त्याचे ते बोलणे काहीसे आतल्या आतच जिरते. ह्या प्रयोगात ४०/४५ पात्रे कामे करतात. पण टीम वर्क चांगले होते. नायक, नायिका, खल नायक, नायकाला मदत करणारा मित्र वगैरे चाकोरीतली पात्रे ह्या नाटकात नाहीत. त्यामुळे यातल्या कुठल्याही एकाच पात्राला महत्त्व नाही. अशा वेळी टीममधला प्रत्येक कलाकार महत्त्वाचा आहे–असतो. त्यादृष्टीने ह्या नाटकातल्या साऱ्याच कलाकारांचे व दिग्दर्शक रमेश चौधरींचे अभिनंदन केले पाहिजे. हा प्रयोग हे एक धाडस आहे–होते. त्यामुळेच लेखक-दिग्दर्शक-कलाकार यांनी हे आव्हान स्वीकारले व यशस्वी केले याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. आजच्या राजकीय-सामाजिक पार्श्वभूमीवर 'विवेका'चा विलोरी आरसा समाजापुढे उभा करणारे हे स्फोटक, बोचक सामाजिक व्यंग सादर करून लेखकाने एक मोठे सामाजिक कार्य केले आहे असे मला वाटते.

**–चित्रगुप्त**

---

(पान १० वरून–**जखम**)

पत्नीला घेऊन खरेदी करायला आले होते. दुकानातल्या नोकराने नुकत्याच किटसनच्या बत्त्या लावून ठेवलेल्या होत्या. नवऱ्याच्या पाठोपाठ दुकानात प्रवेश करणारी ती स्त्री त्या झगमगत्या दिव्याच्या प्रकाशात एखाद्या सजलेल्या चैत्रगौरीसारखी वसंताला वाटली होती.

ते रूप काही ऊर्मिलेला लाभलेले नव्हते. सख्ख्या वहिणी, परंतु किनखापी कापड अन् चोळीचा खण यांच्याएवढ्या वेगळ्या. आप्पासाहेबांच्या श्रीकांतामध्येच आईच्या देखणेपणाची काही झांक उतरली होती . . . पण . . . कदाचित् त्यामुळेच तो नाटक सिनेमासारख्या बायकी धंद्यात पडला असला पाहिजे !

ऊर्मिला दुधाचा एक कप पैदा करून पुन्हा वसंतरावांकडे आली. तो कप तसाच तिच्या हातात देत वसंतराव म्हणाले, "तुम्ही आधी घ्या ! मी काही या घरात परका नाही !"

अनुक्रमणिका






वसंतरावांच्या हातांच्या स्पर्शाने ऊर्मिलेला कांही वाटले नाही, पण त्यांच्या या वाक्याने मात्र मनात मंजुळ वीणेच्या तारा छेडल्या गेल्या.

"नाही हो, घ्या तुम्ही ! मी आणते दुसरा कप !" असे म्हणत, डोळ्यात प्राण आणून ऊर्मिलेने वसंतरावांकडे पाहिले.

कपाची अशी देवाणघेवाण करण्यात दूध निवेल या भीतीने वसंतरावानी आता मात्र तिच्या हातातून कपबशी घेतली. काठोकाठ भरलेला तो गरम, आटीव दुधाचा कप तोंडाला लावताना त्याना वाटले, जगात मोजता येण्यासारखे ते हे सुख. अन् तरीही याची चव मनात रेंगाळत राहते याचे कारण अपचनाच्या भीतीने आपण एखाद दुसराच कप भरून दूध पितो. जाणूनबुजून सुख मोजून घेतो. अन् त्यामुळे मागाहून खंत वाटत नाही !

"कसला विचार चाललाय् ?" ऊर्मिलेने आपल्या दोन्ही हातांच्या पंजाची गुंफण ओच्यात घेत, शरीराला मंदसे झोंके देत, विचारले.

"बंगला छान बांधलाय् नाही आप्पासाहेबांनी ?" उत्तरादाखल वसंतरावाना उत्स्फूर्त वाक्य सुचले.

"हो, माई हवी होती हे वैभव बघायला !" एक सुस्कारा टाकीत ऊर्मिला म्हणाली.

"चालायचंच ! त्यांचंच नाव दिलंय् ना आप्पासाहेबानी बंगल्याला !"

आणि मग वसंतरावाना वाटले की आपण प्रसंगानुकूल असे काही बोललो नाही. कापड दुकानात आपण अनेक वर्षांच्या सवयीमुळे बोलण्यातले आर्जव जसे साफ गमावून बसलेलो आहोत तसेच आपल्या एरवीच्या संभाषणाचे तर झालेले नाही ना ? अन् साड्या खरेदी करण्यासाठी येणाऱ्या एकापेक्षा एक नीटस चेहऱ्याच्या स्त्रिया पाहून आपल्या नजरेतसुद्धा आपल्या बोलण्यातला मख्खपणा आलेला नाही ना ? चांदण्यात इतकी लाडीक दिसणारी ऊर्मिला आपल्या मनात नीटशी कां ठसत नाही ?

"गाण्याला नव्हता का हो तुम्ही ?" आपल्या आगळिकीची भरपाई करण्यासाठी जणु वसंतरावानी ऊर्मिलेला विचारले.

"खाली आक्कांना मदत करीत होते !" ऊर्मिला म्हणाली, "ऐकू येत होतं पण वरून !"

"बरं होतं !" रिकामी कपबशी तिच्या हातात देत वसंतराव म्हणाले, "पण आपल्याला काही फारसं कळत नाही बुवा या गाण्यातलं !"

या बोलण्याचा मात्र ऊर्मिलेला राग आला. तसे तिने नटवर्यांचे गाणे अजून गच्चीवर बसून ऐकलेलेच नव्हते. पण आप्पासाहेब एखाद्या साधारण गवयाचे गाणे कसे ठेवतील ?

वसंतराव बोलतच होते !

"आमच्या या धंद्यात करमणुकीला फारसा वेळच मिळत नाही हो ! जातीनं लक्ष ठेवावं लागतं सगळीकडे ! फार धावपळ होते. तुम्हाला कल्पना येणार नाही..." * *

त्यांच्या बोलण्यावरचे ऊर्मिलेचे लक्ष उडाले होते. ती आका-शातल्या पूर्णचंद्राकडे पाहात होती. क्षणभर तिने आपले डोळे मिटले. वसंतरावांचा आवाज बळजबरीने तिच्या कानात झिरपत राहिला. त्यावर तोडगा म्हणून तिने पुन्हा डोळे उघडले अन् भोव-ताली स्निग्धपणे पसरून राहिलेले कोजागिरीचे चांदणे आपल्या दृष्टीत, आपल्या अंगांगात सामावून घेण्याचा प्रयत्न केला.

"मावशी ऽ ऽ !" या उमाच्या हाकेने ऊर्मिला भानावर आली. आक्का खालून बोलावीत होत्या. वसंतरावांचा निरोप घेऊन जावा का ? पण नको, आता हा दूधपानाचा कार्यक्रम संपला की आपण गच्चीवर येऊन गाणे ऐकायला बसूच !

ऊर्मिला तशीच खाली गेली.

"आप्पासाहेब, आज मजा आली हं !" गावचे एक मोटारवाले फुर्र फुर्र करीत दूध पीत त्याना सांगत होते, "वाटतं दररोज कोजागिरी असावी !"

"पण तुम्हीच म्हणता ना डॉक्टर, जागरणं प्रकृतीला बरी नव्हेत म्हणून!" गावचे दुसरे एक सभ्य नागरिक 'खिः खिः खिः' करीत हसत म्हणाले.

"आपल्या या नटवर्यांची प्रकृती चांगली ठणठणीत दिसते ! त्यांच्या व्यवसायात जागरणांना किंमत नसेल; नाही हो आप्पासाहेब ?"

"काय वय असेल हो त्यांचं ? साठी उलटलेली वाटत नाही !"

"माझ्याच वयाचा आहे तो ! आप्पासाहेब म्हणाले, "अहो, पुण्याला कॉलेजात आम्ही एकत्र होतो ! परवा अचानक पत्र आलं त्याचं नाटकानिमित्तानं इथं येत आहोत म्हणून ! मग म्हटलं कोजागिरीला जमलं तर गाणं करून टाकू !"

इतक्यात नटवर्यच गळ्यातला मफलर जरा घट्ट लपेटून घेत, डुलत डुलत आप्पासाहेबांच्या रोखाने आले. चांदण्यातून ते जसजसे जवळ आले तसतसा त्यांचा चेहरा आप्पासाहेबाना जास्त जास्त म्हातारा वाटत गेला. केसाला त्यानी कलप लावलेला होता, अन् त्यातून अंजिरी रंगाचे, राखाडी रंगाचे अन् पांढऱ्या रंगाचे केस जणू मोर्च्यात उभे राहून नटवर्यांच्या उसन्या तारुण्याचा निषेध करण्याच्या मिषाने सलग डोकावीत होते !

"बरं वाटलं हं तुझ्या बंगल्यात !" नटवर्य म्हणाले, "लोक-सुद्धा रसिक आहेत इथले !"

"आता मुक्कामालाच या कधी तरी !" आप्पासाहेब म्हणाले.

"अरे, तुझा मुलगा कुठं दिसला नाही तो ?" नटवर्य म्हणाले, "मागं मी जुन्या घरात आलो होतो तेव्हा शाळेत जायच्या वयाचा होता ! कदाचित् माझ्यासमोरच गाण्याला बसला असेल.. अन् मला ओळख पटली नसेल !"

मोटारवाले डॉक्टर अन् प्रतिष्ठित नागरिक सर्द चेहरे करून हे सारे ऐकत होते ! क्षणार्धात गच्चीच्या त्या कोपऱ्यातले वातावरण नटवर्यांनी तंग करून टाकले होते ! आप्पासाहेबाना काय उत्तर द्यावे ते सुचेना. मागे याच नटवर्यांनी नाही का श्रीकांत सिनेमात गेल्याचे आपल्याला कळवले होते ? वयोमानाप्रमाणे या लेकाला काही स्मृतिभ्रंश वगैरे तर झालेला नव्हता ना ?

मग आप्पासाहेबांच्या लक्षात आले—नटवर्यसुद्धा नाटकात जाणार म्हणून घर सोडून बाहेर पडले होते. पण आत्ता, या क्षणाला, आप्पासाहेबही गप्प झाले होते. चांदण्याच्या फसव्या प्रकाशात त्यांच्या चेहऱ्यावरचे भाव ओळखता येत नव्हते.. नटवर्याच्या प्रश्नाला उत्तरच जणु म्हणून त्यांनी आपला उजवा हात त्यांच्या खांद्यावर ठेवला आणि त्या अडाणी गायकाला जरा बाजूला नेले. मात्र क्षणभर त्याना असे वाटले... असे वाटले, की बोलून आपला घात करणाऱ्या या माणसाचा मफलर खेचून त्याला फाशी द्यावे!

पण त्यानी आपल्याजवळचे, पांढऱ्या लिफाफ्यातून वर आणलेले, शंभर रुपये नटवर्यांच्या हातावर ठेवले अन् म्हटले, "ही आपली अल्प दक्षिणा!"

"अरे, कशासाठी कशासाठी? तुझं घर तेच माझं घर!" नटवर्य म्हणाले.

"फॉर ओल्ड टाइम्स सेक!"

"ओ. के. फॉर ओल्ड टाइम्स सेक!" नटवर्य खिकाळले, "बाय द वे, अरे आक्का नाही आल्या गाण्याला!"

"बोलावतो तिला!" आप्पासाहेब म्हणाले, "खाली फराळाची तयारी चालली होती ना?"

"तिच्यासाठी खास भजनं म्हणतो बघ!" नटवर्य म्हणाले. मग कानाच्या पाळीला हात लावीत ते उद्गारले, "अरे, गंधर्वांचा खाक्या! आधी नाटकातली लाडिक गाणी अन् मग आकाशाला गवसणी घालणारी भजनं!"

आकाशाला गवसणी घालतोय् लेकाचा! आप्पासाहेब मनात म्हणाले. मग जवळच रिकाम्या कपबशा जमवीत असलेल्या आपल्या लेकीला ते म्हणाले, "निमा, आक्काला पाठव वर! अन् तुम्हीही येऊन बसा गाण्याला!"

**

आक्का हळूच मांजरपावलांनी जिना चढून आल्या. नटवर्यांच्या तंबोऱ्याचा झणत्कार त्यांच्या कानात शिरला अन् कित्येक वर्षांपूर्वी, आपल्या लग्नानंतर, भानुविलासमध्ये पाहिलेल्या 'संशयकल्लोळ' नाटकाची त्याना आठवण झाली. त्यातल्या नायकिणीच्या घरात असेच तंबोरे ठेवलेले त्यानी पाहिले होते... अन् आपल्या यजमानांच्या कानात हळूच विचारले होते, "हे कोणी छेडीत का नाही? हे असें मुक्र का?"

यजमानांनी आपली चीड आवरीत विचारले, "मघा जलशाच्या प्रवेशात काय पाहिलंस तर?"

"खरंच, माझ्या लक्षातच नाही! वेडीच की हो मी!"

त्या आठवणींने क्षणभर विषादाची एक भावना आक्कांच्या मनात रेंगाळून गेली. त्यांचे आणि त्यांच्या यजमानांचे सूर कधीच जुळले नाहीत...पण क्रूर नियतीने त्यांच्या यजमानांच्याच डोक्यावर हात ठेवला. .ठार वेडे म्हणून त्यांची ठाण्याला रवानगी करावी लागली, आणि त्यातच कसल्या तरी सांथीच्या आजाराचे निमित्त होऊन त्यांचा अंत झाला...लगोलग आक्का आपल्या भावाकडे राहायला आल्या.

या आठवणी एव्हाना पार बुजल्या होत्या. दुसऱ्याच्याच कोणाच्या तरी आयुष्यात हे घडले आहे असे आक्कांना वाटत असे.. पण आज मात्र साध्या तीन तारांच्या आवाजाने त्यांच्यात अन् त्या पूर्वीच्या, अभागी आक्कात तादात्म्य साधले होते!

नटवर्यांच्या गाण्यात हळुहळू त्या रंगून गेल्या तसे मातीचे ढेकूळ स्वच्छ पाण्यात विरघळावे तशी त्यांच्या मनाचीही टोचणी आपोआप कमी झाली. आता त्या श्रोत्यांत बसलेल्या मंडळींवरून नजर फिरवीत मनातल्या मनात, जणू प्रत्येकजण एखाद्या यादीतील वस्तू असल्याप्रमाणे, त्याची पारख करीत होत्या. .हा अमुकअमुक उमाला चांगला नवरा शोभेल असे मनाशी म्हणत होत्या... ही अमक्याची सून इतकी फॅशन केव्हापासून करायला लागली? वसंतराव असे डोळे मिटून कां गाणे ऐकताहेत? .ऊर्मिला कुठे आहे? ऊर्मिला...?

आक्कांच्या जवळच उजव्या हाताला ऊर्मिला बसली होती. बऱ्याच वेळाने, पूर्ण वर्तुळाकार नजर फिरवून झाल्यावर, आक्कांच्या ते लक्षात आले...ती अशी गाणाऱ्या त्या नटाकडे टक लावून काय बघते आहे? अधूनमधून जरा मान खाली घातलेली दाखवायला हवी! या कॉलेजातल्या पोरी...वसंतरावानी आप्पासाहेबांना तिच्याबद्दल नक्की काय सांगितले? बाकी पुण्याला एकटी राहणारी ही पोरगी. .सहज स्वतःचे लग्न जुळवून घेईल! अन् आप्पानेसुद्धा तिची जबाबदारी कुठवर वाहायची?

**

गाण्याकडे लक्ष नव्हते ते फक्त आप्पासाहेबांचे! बंगला बांधला होता, पण मन तृप्त नव्हते. ते अस्वस्थ होते. खास प्रयत्न करून श्रीकांतचा शोध लावायला हवा. त्याच्यावर असे चिडून चालायचे नाही...घरात सून पाहिजे...नातवंडे पाहिजेत—अन् तीसुद्धा आपल्या घराण्यातली! पण श्रीकांत एव्हाना लग्न करून तर बसला नसेल ना? भलत्या सलत्या एखाद्या बाईशी?

वसंतरावांचा नाद आता सोडायला हवा...ऊर्मिलेलाच सांगायला हवे, तुझे कॉलेजचे शिक्षण नीट संपव म्हणून! ती जरा जास्त हुशार असती तर प्रोफसरसुद्धा झाली असती... नोकरी अन् नवरा एकत्रच गाठला असता... केवळ आपली मेव्हणी म्हणून...

त्या क्षणी आपल्या दिवंगत पत्नीची आप्पासाहेबांना अतिशय तीव्रपणे आठवण झाली. .तिच्या हातांचा मखमली स्पर्श, निरांजन पेटविल्यासारखे तिचे ते मंद, लाजरे स्मित...खोबऱ्याची बर्फी जिभेवर ठेवल्यागत कानांना सुखविणारा तिचा आवाज... तिचे बोलण, चालणे. .तिचे गौरवर्णीय लावण्य तिच्या लुगड्यांच्या तऱ्हा...

नटवर्यांनी अभंगाला सुरुवात केली:
"नाम घेता उठाउठी। होय संसाराची तुटी॥"
घोळवून घोळवून तारस्वरात ते ह्या ओळी म्हणू लागले.

आक्कांच्या डोळ्यात पाणी साचू लागले होते. कोजागिरीचे चांदणे त्यात विरघळू लागले... अन् क्षणभर अंधत्व आल्यासारख आक्कांना काही दिसेनासे झाले.

(पान ५२ वर पहा)

# भारतात 'भारतीयीकरण' नको (!)



लोकसभेत 'रावात' प्रकरणी तांत्रिक दृष्ट्या भारतीय शासनाचा विजय झाला असला तरी 'रावात'चे एकूण प्रकरण भारतीय लोकनेत्यांना, त्यांच्या वकिलांना व शासनाच्या लोकमानसातील 'प्रतिमे'ला जबरदस्त धक्का देणारे ठरले आणि त्या धक्क्याने भलेभले कसे चकले व चुकले आहेत याचा सतत प्रत्यय गेल्या काही महिन्यात-दिवसात जनतेला मिळतो आहे. 'राजा कधी चुकत नाही' ह्या राजेशाही युगातील श्रद्धेप्रमाणेच लोकशाहीतील लोकनियुक्त व बहुमत धारण करणारे शासन कधी चुकत नाही अशी श्रद्धा प्रगत जनतेनेही बाळगावी अशी शासनाची अपेक्षा निदान 'रावात' प्रकरणी तरी दिसून आली. वास्तविक पाहता कुठल्याही 'सैद्धांतिक' कारणासाठी आम्ही थपडा खाण्यासाठी 'राबात'ला गेलो नाही. लाचार पद्धतीने आमंत्रण मिळावे म्हणून खटपट केली. 'तुकडा टाकावा' तसे आमंत्रण दिले गेले. तो तुकडा म्हणजे 'बहोत मेहेरबानी' अशी समजूत करून घेऊन आमचे जनावे फक्रुदिन अली (आणि कंपनी) धावत पळत तेथे गेले. (जातीय परिषदेला जायचीच जरूर कोणती ? जायचेच होते तर परराष्ट्र खात्यातील एखादा प्रतिनिधी कां नाही गेला ? तेथे जनावे अलीच कशासाठी धाडले गेले ?—अर्थातच ह्या प्रश्नांची उत्तरे कधीच मिळणार नाहीत.) आणि पाकिस्तानी (आणि परेश) चपराक खाऊन परत आले. आल्या आल्या गाल चोळीत व्यथा ताजी असल्याने म्हणाले की 'आपले परराष्ट्र धोरण एकदा तपासून पाहिले पाहिजे" पण नंतर कॉंग्रेस फुटली. आणि 'इंदिराजी कॅन डू नो रॉंग' असा नवा साक्षात्कार झालेले दिनेश–फक्रुदिन यांनी आम्हीच कसे बरोबर होतो हे लोकसभेत पटवून देण्याचा प्रयत्न केला. त्या प्रयत्नात 'डांगे' यांची (नवी) साथसोबत प्रभावी ठरली असली व तांत्रिक विजय मिळाला असला तरीही त्या प्रकरणी पुन्हा एकदा 'जातीयवाद' ह्या शब्दाने दिल्लीकरांना अशांत व अस्वस्थ केले आहे. इतके अस्वस्थ की, आपण नेमके काय बोलत आहोत, कुठल्या संदर्भात बोलतो आहोत, कुणाला उद्देशून बोलतो आहोत, आणि त्याहून कुणाला व कशाला संरक्षण देण्याच्या भावनेने बोलत आहोत हेही कळेनासे झालेले दिसते. 'पक्षीय' धुरळ्याने विचारी व संयमी म्हणून ज्ञात असलेल्या यशवंतराव चव्हाणांची दृष्टि इतकी मलिन व इतकी लाचार व्हावी ह्याचा फार खेद होतो. वास्तविक ते ज्या खात्याचे मंत्री आहेत त्या खात्याचाच जातीय दंग्यांबाबतचा अहवाल सांगतो की चोवीस दंग्यांपैकी तेवीस दंगे मुसलमानांनी सुरू केले होते. सत्तेच्या सुंदोपसुंदीत गृहमंत्र्यांनी हे सत्यही विसरावे व ज्या अहमदाबाद प्रकरणी त्यांनी कॉंग्रेस फुटण्यापूर्वी वेगळी भूमिका घेतली होती ती बदलावी आणि आपल्या 'कॅंप'मध्ये केवळ गुजरात शासन बसत नाही म्हणून त्या शासनाला काही दोष द्यावेत हे समजू शकत नाही. त्याहूनही खेदाची गोष्ट अशी की, यशवंतरावांनी न्यायमूर्ती छगला यांना उत्तर देताना जी भाषा वापरली आहे ती भाषा आणि जो सिद्धांत मांडण्याचा प्रयत्न केला आहे तो सिद्धांत ह्या दोन्ही गोष्टींनी त्यांनी स्वकर्तृत्वाने निर्माण केलेल्या प्रतिमेला तडा गेला आहे. छगला यांची राष्ट्रीयवृत्ती व त्यासाठी द्यावी लागणारी किंमत देण्याची त्यांची निःस्पृह व ताठ वृत्ती यांचा जनमानसातील ठसा कायम आहे. काही माणसे मंत्री होतात म्हणून त्यांना मोठेपणाचे 'वर्ख' चिकटते (वा चिकटविण्यात येते) परंतु सुवर्णाला वर्ख लागत नाही. ते चमकत राहते. त्याला पांढरी झूल चढवली वा न चढवली तरीही ते सोनेच राहते. छगला हे तसे गृहस्थ आहेत. आणि त्यांच्या शत्रूलाही त्यांचे डोके तपासून घेण्याची सूचना करण्याचे धाडस होणार नाही. परंतु पक्षीय अभिनिवेश हा विवेकभ्रष्ट करतो असे खेदाने म्हणावे लागते. अन्यथा यशवंतरावजींनी की छगलांना जे ऐकवले त्याची संगती कशी लावायची ? तेही एक वेळ आम्ही क्षम्य मानले असते. परंतु त्यापुढे चव्हाणांनी जातीय दंग्यांबाबतची एक अभिनव व अतिनव उत्पत्ती लावली आहे ती वाचून अधिक खेद होतो. एकीकडे जातीय वादाला सतत शिव्याशाप देत रहायचं आणि एकीकडे त्या भावना जगतील - वाढतील अशी परिभाषा वापरायची याची संगती काही लागत नाही. "भारतातील मुसलमानांच्या भारतीकरणाचा आग्रह फार धरला जातो म्हणून जातीय दंगे होतात." असं काही तरी चव्हाण म्हणाले. त्यानंतरही हा 'भारतीकरणा'चा मुद्दा त्यांनी पुन्हा एकदा मांडला तेव्हा ती त्यांची श्रद्धा दिसते. भारतात भारतीकरणाची अपेक्षा करणे ह्यात चूक काय ते आम्हा पामरांना समजत नाही. इंग्लंडमध्ये इंग्लंडवरील श्रद्धा ही राष्ट्रीय ठरते. जर्मनीत जर्मन राष्ट्रवाद हा धर्म ठरतो. रशियात रशियन राष्ट्रवादानेच लेनिनग्राड, स्टॅलिनग्राडचे प्रचंड लढे लढवले जाऊ शकतात. चिनी अस्मिता चीनला अजेय करू शकते. मग पाकिस्तान निर्मितीनंतर इथे केवळ भारतीय राष्ट्रवादाची अपेक्षा केली तर ती गैर कशी ?










मुसलमानांच्याच बाबतीत नेमकी ही अपेक्षा गैर कां मानली जावी ? येथल्या इतर जाती-जमाती जर भारतीय निष्ठा पचवू शकतात व जातीय दंगे घडत नाहीत तर मग मुसलमानच इथे दंगे कां करतात ? त्यांच्या त्या विभक्त भावनेचे कोडकौतुक करूनच पाकिस्तानची निर्मिती झाली हा इतिहास विसरण्याइतका जुना झाला आहे काय ? त्या भावनेपोटी झालेल्या हत्याकांडाचे पुरावे आजही हयात आहेत. सांडल्या गेलेल्या निरपराध रक्ताचे डागही मनामनात आणि ह्या मातीत पुरते सुकलेले नाहीत. त्यानंतरच्या पाक स्वाऱ्यांची स्मृती अजून ताजी आहे आणि त्यापायी गमावलेले श्यामाप्रसाद, लालबहादुर शास्त्री यांच्या स्मृतीही अजून कायम आहेत. औरंगाबादनंतर अहमदाबाद घडले, क्वचित इंदोरचा नंबर असाच लागून गेला. क्रीडेच्या, चित्रपटाच्या, समाजजीवनाच्या विविध थरातून पाक निर्मितीपूर्वीचाच सौदेबाज स्वार्थ आजही धुमाकूळ घालताना दिसतो आहे. मुस्लिम विचारवंत, खान अब्दुल गफारखानांसारखे ज्येष्ठ नेते, छगला-हमीद दलवाईसारखी माणसे कंठरवाने सांगताहेत की इथे रहायचे, इथेच खायचे-प्यायचे, ह्याच मातीचे स्तन्य प्यायचे तेव्हा इथल्या जीवनधारेशी एकरूप होण्याची गरज आहे. आणि आमचे गृहमंत्री मात्र म्हणताहेत की भारतीयत्वाचा आग्रह धरला जातो म्हणून दंगे होतात. भारतात भारतीयत्व हेच खरेखुरे स्वाभाविक कर्तव्य ठरते. तोच खरा धर्म ठरतो. एखादा हिंदु, पारशी, ख्रिश्चन वा यहुदी माणूस भारतात राहून या राष्ट्रीय विचार-भावनेशी बेइमान झाला तर तो धर्म ठरेल ? न्याय ठरेल ? त्याच्या बेइमानीला शासकीय संरक्षण मिळेल ? ह्या मूलभूत गोष्टींवर गृहमंत्री तडजोड करतील ? त्यांनी भारतीय रहावे व भारतीयत्वाचा गौरव बाळगावा. भारतीयत्वाची ध्वजा उंच करावी ही जर एक देशभक्त गृहमंत्री म्हणून चव्हाण अपेक्षा करीत असतील तर स्वेच्छेने, जाणून बुजून, निवडीची संधी १९४७ साली दिली गेलेली असताना जे मुसलमान येथे राहिले आहेत त्यांनी भारतीयत्वाचा गंडा बांधावा. त्यात सन्मान मानावा, प्रसंगी त्यासाठी एखाद्या भगतसिंग-धिंग्रा-सावरकर, सुभाष, गांधी, नेहरू यांच्याप्रमाणे निष्ठेने सेवारत व्हावे अशी अपेक्षा करणे यात 'डोके बिघडले हो !' असे म्हणण्यासारखे काय आहे ? सारा समाज गुन्हेगार वा राष्ट्रद्रोही आहे अशी 'बकवास' कुणीही केलेली नाही. १९४७ पूर्वीही असे कुणी म्हणत नव्हते. परंतु पाक 'निर्मितीनंतरही जेव्हा 'स्वीकृत निष्ठांना तडे जातील असे वर्तन घडते तेव्हा एखादा छगला वा दलवाई उठतो. 'जातीय दंगे' हे दुखणे फार जुने आहे आणि अल्प-बहुसंख्य ही परिभाषाही फार जुनी आहे. निधर्मित्वाच्या नावाखाली "नका हो नका. भारतीय निष्ठांचा आग्रह धरू नका' असा एक नवा खुषीकरणाचा मंत्र जेव्हा ह्या देशाचे गृहमंत्रीच जपू लागतात तेव्हा ह्या देशाशी कुणी निष्ठावंत म्हणून रहावे व त्यांनीच व त्यांनी तरी कां रहावे असा सवाल विचारावासा वाटतो. पाकिस्तानमधून हाकलले गेलेले वा आजही हाकलले जाणारे सारे हिंदू गुन्हेगार-निष्ठाशून्य, अप्रामाणिक वा पाक उलथून पाडायला निघालेले होते का हो ? तेथे पाक-राष्ट्रीयता हा जर धर्म असेल तर भारतात भारतीय राष्ट्रीयता हा अधर्म कसा ? वा तसे म्हणणे हे डोके बिघडल्याचे लक्षण कसे ? निधर्मित्वाच्या रक्षणाची जबाबदारी बहुसंख्यांकाची ? मग त्यांच्या जीवित वित्ताच्या रक्षणाचे दायित्व कुणाचे ? शासनाचे की नाही ? तसे संरक्षण आज मिळते काय ? दलवाई पुण्याच्या एका बैठकीत म्हणाले होते (त्या बैठकीला तरुण तुर्क मोहन धारिया हेही हजर होते) की, समानतेच्या गप्पा मारणाऱ्या शासनालाच विभक्तता कायम राखू शकणाऱ्या शिक्षण संस्था हव्या आहेत. समान नागरी कायदा नको आहे. विभक्त विद्यापीठे हवी आहेत. विभक्त विचार ठेवूनच, मतदारांच्या संकुचित जातीय भावना ध्यानी घेऊनच उमेदवार उभे केले जातात. हिंदू मोहल्यात मुसलमान उमेदवार वा मुस्लिम वस्तीत हिंदु उमेदवार उभा करण्याची हिंमत होत नाही. तेव्हा भारतीयत्वाचा आग्रह रुजावा, एकात्मता रुजावी, वाढावी अशी पावले ह्या निधर्मी भारतातही पडली नाहीत ही वस्तुस्थिती नाकारण्यात हंशील नाही. अहमदाबाद-इंदूर-औरंगाबादचे दंगे ह्यानी काही धडा शिकवला असेल तर तो हाच की, ह्या विभक्त करणाऱ्या प्रेरणा मुळातच गाडल्या गेल्या पाहिजेत. मुसलमानच नव्हे तर कुठल्याही जातीय प्रवृत्तींचे राजकीय कोडकौतुक बंद केले पाहिजे. 'जातीयवादा'ची शिवी हासडून तें भूत गाडले जाणार नाही. त्यासाठी व्यापक राष्ट्रीय विचारांची कास धरली पाहिजे. गांधी गुजराती नव्हते, नेहरू काश्मिरी नव्हते, सुभाष बंगाली नव्हते, सावरकर मराठी नव्हते, भगतसिंग शिख नव्हता, छगला-दलवाई मुसलमान नाहीत. ह्या व्यापक बैठकीवरच तडजोड होऊ शकते. मुसलमानाचे व हिंदूचे समान नागरिक म्हणून संरक्षण-संवर्धन झाले पाहिजे. त्यासाठी मूलभूत गरज म्हणून मुसलमानांच्या भारतीयीकरणाचा आग्रह धरला जातो. तो धर्म आहे. हा धर्म ह्यांनी १९४७ साली 'स्वखुषीने' स्वीकारला आहे तेव्हा तो पाळा असा आग्रह छगला-दलवाई वा अन्य राष्ट्रीय विचारवंतांनी धरला (त्यात अनेक मुसलमान विचारवंतही आहेत ही गोष्ट ना. चव्हाणांनी ध्यानी घ्यावी) तर त्यात 'डोके तपासण्या' इतका वेडगळपणा वा मूर्खपणा काय ते समजणे केवळ कठिण आहे. उलट हाच खराखुरा "राष्ट्रधर्म" आहे असे मला तरी वाटते. घरात राहणाऱ्याने घराशी किमान इमान राखावे इतपत हे 'स्वाभाविक' आहे.

—सारस्वत








REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JANUARY

DIPAVALI MONTHLY






Cover Printed At Asha Printery, Bombay-

अनुक्रमणिका